अनुभवलहरी : लहर दुसरी



# समाधीचे विविध प्रकार : मुख्य समाधि कोणती

लेखक

मंगेश रामचंद्र टाकी ऊर्फ दादाभाई

पंडित श्रीपाद दामोदर सातवळेकर
( गीतालंकार, साहित्य-वाचस्पति )
ह्यांची प्रस्तावना

पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७

मूल्य एक रुपया



# सुवर्ण-रज.





लेखक,

कै. बळवंत जनार्दन करंदीकर,

उर्फ

रमाकांत नागांवकर.

प्रकाशक- फाटकबंधु,

बुकसेलर्स, पब्लिशर्स, गिरगांव, मुंबई.

आषाढमास, शके १८३५, सन १९१३.

किंमत चार आणे.



हें पुस्तक
रा. चिं. स. देवळे यांनीं घर नं. १ सदाशिवगल्ली येथें
'मुंबईवैभव' प्रेसमध्यें छापिलें व तें
रा. बाळकृष्ण नारायण फाटक, व्यवस्थापक फाटकबंधु,
यांनीं,
**रामएजन्सी करितां गिरगांव रोड,**
**घर नं. A १ येथें प्रसिद्ध केलें.**



## या पुस्तकासंबंधानें कांहीं विद्वानांचे

# अभिप्राय.

**दामोदर गणेश पाध्ये**, एम्.ए, प्रिन्सिपाल गोकुलदास तेजपाळ हायस्कुल, यांचा अभिप्रायः—" रमाकांत " या नांवानें काव्यरत्नावली वगैरे पुस्तकांचेद्वारें महाराष्ट्र वाचकांस परिचित असेलेल्या कै. रा. बळवंत जनार्दन करंदीकर यांनीं लिहिलेल्या 'सुवर्ण-रज' या नांवाच्या, रा. फाटक यांनीं प्रसिद्ध करूं घेतलेल्या पुस्तकाचीं प्रुफें मी पाहिलीं. कविता आर्याबद्ध आहेत. भाषा प्रौढ व सुबोध असून कवितेस शोभण्यासारखी आहे. कविता विविधविषयांवर आहेत. प्रायः प्रत्येक कवितेंत कांहींतरी नवी कल्पना किंवा शब्दार्थचमत्कृती आहे. पुस्तक रसिकांच्या आश्रयास पात्र आहे. मुंबई, ता. ६ जुलई १९१२.

रा. सा. **विनायक कोंडदेव ओक यांचा अभिप्रायः—**

**सुवर्ण-रज**—ह्या लहानशा पुस्तकांत नीतिबोधपर साडेपांचशें आर्या आहेत. सगळ्या चांगल्या आहेत. मोरोपंतांनीं विराटपर्वाच्या शेवटच्या आर्येंत ह्मटलें आहे कीः-'**स्वल्प ह्मणांनि न सोडी अमृताची शक्ति सर्व चव थेंबा**' त्या न्यायानें ह्या साडेपांचशें **सुवर्ण-रजांस**–ते लहान लहान आहेत तरी–सुवर्णाच्या लगडीच्या कसाइतक्या कसाची योग्यता आहे. तिळमात्र कमी नाहीं. तेव्हां **सुवर्ण-रज** हें नांव ह्या लहानशा पुस्तकास यथार्थ आहे. ह्यांतल्या पद्याच्या अवलोकनानें तरुणांस चांगला नीतिबोध होईल; आणि प्रौढांस नीतिबोधाचें चांगलें स्मरण होईल. म्हणून हें पुस्तक सर्वांच्या संग्रहीं अवश्य असावें. **सुवर्णरज** आहेत, ते आपला गुण कधीं सोडणार नाहींत. मुंबई, ता. ७।७।१३

रा. ब. **पुरुषोत्तम बाळकृष्ण जोशी**, जे. पी. एफ्. आर. जी. एस्., मुंबई युनिव्हर्सिटीचे फेलो व मुंबई युनिव्हर्सिटीचे मराठी भाषेचे परीक्षक ह्यांचा अभिप्रायः—**सुवर्ण-रज** हें आर्यागीति छंदांत लिहिलेलें पुस्तक मी लक्ष्यपूर्वक वाचून पाहिलें. कविता सरळ व सुबोध असून तींत व्याकरणाच्या किंवा साहित्य शास्त्राच्या नियमांचें उल्लंघन केल्याचें बहुशः दिसून येत नाहीं. कविता विविध विषयपर असल्यामुळें वाचतांना मौज वाटते पण कित्येक महत्वाचा विषयांचें विवेचन अगदींच त्रोटक रीतीनें ह्मणजे एकाच आर्येंत संपविल्यामुळें वाचतांना रसहानि होते व मनाची प्रसन्नता कायम रहात नाहीं. पुस्तकांतील विषय बोधप्रद व सदाचारविवर्धक असून कवितेत प्रमातिरेकानें वेडावलेल्या व स्वातंत्र्याच्या निमित्तानें कविता वधूस शालीनता सोडून एखाद्या पण्यांगनेप्रमाणें सैरावैरा नाचविणाऱ्या कित्येक निर्धमक्या आधुनिक कवींच्या कृतींचें अनुकरण नसून समग्र कविता रसिकजनमान्य अशा पूर्वकविपरंपरेस अनुसरून आहेत. हें पाहून मनाला समाधान वाटतें. पुस्तक वाचनीय असून संग्राह्य आहे. मुंबई, ता. ९ जुलई, सन १९१३

# प्रकाशकाचे दोन शब्द.

प्रस्तुत पद्यात्मक ग्रंथ कै. बळवंत जनार्दन करंदीकर ऊर्फ रमाकांत नागांवकर यांनीं नीति आणि व्यवहार यांचीं सर्वसामान्य तत्वें विद्यार्थ्यांस सुलभ भाषेंत समजावून देण्याच्या उद्देशानें लिहिला आहे. परमेश्वर, विद्या, उद्योग, द्रव्य, आलस्य, मितव्यय, इत्यादि अनेक विषयांसंबंधानें प्रस्तुत ग्रंथांत जो उपदेश करण्यांत आला आहे, त्याचें महत्व किंती आहे, हे ग्रंथ वरवर चाळून पाहाणाराच्याही सहज लक्ष्यांत येण्यासारखें असल्यामुळें, त्यासंबंधानें येथें विशेष कांहीं लिहिलें पाहिजे, असें आम्हांस वाटत नाहीं. गद्यापेक्षां पद्य पाठ करावयास सोपें असल्यामुळें, ह्या पुस्तकांतील आर्या विद्यार्थिजनांस सहज मुखोद्गत करितां येतील व त्यांतील सदुपदेशाचा योग्य तो फायदा आपल्या भावी आयुष्यक्रमांत त्यांस सुलभतेनें करून घेतां येईल, अशी आम्हांस आशा आहे. ' रसात्मक काव्यं ' ह्या काव्याच्या व्याख्येची कसोटी मात्र प्रस्तुत ग्रंथास लावण्याचा प्रयत्न करून कोणी निराश होऊं नये, अशी आमची सर्वांस सविनय विनंति आहे. हल्लीं नीतिशिक्षण व धर्मशिक्षण यांची आवश्यकता उत्कटत्वानें भासूं लागली असून, तत्संबंधाची चर्चा सर्व देशभर चालू आहे; अशा वेळीं प्रस्तुत ग्रंथासारख्या ग्रंथांची उपयुक्तता आणि आवश्यकता किती आहे, हें आम्हीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. आपल्या मुलांच्या नीतिशिक्षणासंबंधानें आस्था बाळगणाऱ्या सर्व आईबापांस आमची अशी विनंति आहे कीं, त्यांनीं प्रस्तुत ग्रंथाची एकेक प्रत आपल्या मुलांस अवश्य घेऊन द्यावी व त्यांतील नीतिपाठाच्या सुबोध आर्या सवडीप्रमाणें त्यांजकडून पाठ करून घ्यावा. तरी ग्रंथकाराच्या या परिश्रमाचें योग्य तें चीज मराठी भाषा बोलणाऱ्या सर्व लोकांकडून केलें जाईल, अशी आम्हांस आशा आहे.

शेवटीं हें पुस्तक लवकर छापून दिल्याबद्दल, 'मुंबईवैभव' छापखान्याचे म्यानेजर यांचे व आमचे मित्र रा. रा. जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर सं. 'ज्ञानांजन' यांनीं कांहीं बाबतींत योग्य सूचना केल्या व कच्चीं टांचणें तपासून दिलीं याबद्दल त्यांचे आभार मानून हा प्रास्ताविक लेख पुरा करितों.

# सुवर्ण-रज.



## ईश्वर.

सामान्य नियम हा कीं, कर्त्यावांचून न क्रिया घडते
अस्तित्वास प्रभुच्या, परंपरा ही अखंड परि नडते १
नलगे कारण त्याला, अजात तो नित्य सच्चिदानंद
स्वयमेव कार्यकारण, जाणे न असें परंतु मतिमंद २
वास करी सकलांच्या हृदयीं प्रज्ञा तयास ती जाणे
अनुवाद तिचा करितां, रूप तयाचें पुरें मनीं बाणे ३
ज्ञान अटोकाट किती, मनुजाचें काय त्याजला कळतें
कळतें परंतु तितकें, जगदात्मा ओळखावया पुरतें ४
जीवन केवळ जीवन, परि वातावरण काय हें कमती
प्रभुची अघटित लीला त्यावांचुन सृष्टि काय ही टिकती ५
हे आयतेच मिळती पदार्थ दोन्ही जगांत विपुलत्वें
देवाचे मानावे आभार किती तरी कृतज्ञत्वें ६
सृष्टपदार्थी साऱ्या वातावरणीं जगन्नियंत्याचें
सूक्ष्मस्वरूप कळतें, स्थूल हि जाणावयास ये साचें ७
वातावरण न जेथें, न असा अवकाश सांपडायाचा
जगदात्मा सर्व जगीं भरला प्रत्यय न काय हा त्याचा ८
आभार मानिल्याविण, देवाचे दिवस एकहि न जावा

ध्यावें सुखें स्मरावें, करिती जन संकटीं जसा धांवा ९
ऐश्वर्ययुक्त वसुधा, तेजोमय नभ विलोकितां नुसतें
जगदीशाची सत्ता, करुणा मोठी किती न कां कळतें ? १०
मानवहितार्थ असते प्रभुची प्रत्येक योजना खचित
जरि ती कोत्या समजें केव्हां केव्हां न वाटते विहित ११
वाटे अहितप्रद जें, निघतें कल्याण त्यांतुनीच कधीं
जाणुनि सर्वसमर्थीं जगदीशीं भाव ठेवितात सुधी १२
जें जें घडतें तें तें दैववशें वा घडे अनायासें
ईश्वर घडवुनि आणी, मानवमतिला तसें न जरि भासे १३
गोष्ट न लपवाया ये देवापासून युक्तिनें मोठ्या
साऱ्या लहानमोठ्या, गोष्टी जो जाणतो खऱ्याखोट्या १४
*मार्ग मनीं असलें तर अगणित परमेश्वरास ताराया*
त्यावांचुन मनुजाचे, जाती श्रमयत्न सर्वथा वांया १५
देवावरी भरंवसा ठेवुनियां जे तया शरण रिघती;
पात्र कृपेला त्याच्या, कसल्याही संकटांत ते तरती १६

**सृष्टि.**

सरिता अरण्य पर्वत नर रवि शशि पवन तारका गगन
इत्यादि सृष्ट विषयीं ज्ञान किती तें पहा करी मनन १७
ग्रंथांत एक उत्तम सृष्टीचा ग्रंथ केवढा भव्य
सांठविले त्यांत पहा हितबोधाचे किती विषय दिव्य १८
गुरु केलें सृष्टीला, झाला उपदेश ज्यास आकळलें
ब्रह्म—स्वरूप त्याला, गूढ जगीं त्या मुळीं नसे उरलें १९
सौंदर्यानें भरली आहे परिपूर्ण सृष्टि ही सारी

रमवी निरीक्षण तिचें घटकाभर सर्व काळजी वारी
जेव्हां उत्साह सरे, नष्ट उदासीनता मनांत भरे
औषध त्यास वनश्री अवलोकावी तसें नसे दुसरें २१
जी सृष्ट योजना ती हितकारक आड जो तिच्या येतो
करुनि बळें तो मोठी निजकृतिनें हानि आपली घेतो २२
दिसतात निरुपयोगी. कृमिकीटक जे असंख्य भूवरती
उपयोगावांचुन कां केले निर्माण ईश्वरें असती २३
सृष्ट पदार्थ सुखास्तव सेवी सद्धर्म नीति राखून
उपकार ईश्वराचे विस्मर न अशा सुखांत गुंतून २४

## मन.

शत्रूंत शत्रु मोठा एक नराला असे मन प्रबल
विरळा तयास जिंकी, कोण तयाच्या बळें न हो विकळ २५
दुष्कर दुर्घट ऐसें काय असे मानवा करायास
यत्नें मोठ्याहि परी ये चंचल मन न आकळायास २६
करि न बरें तर मन हें मुळींच, उलटी परंतु हानि करी
कृत्यें अशीं तयाचीं, जीं पशुहि करावयास लाज धरी २७
प्रकृतिभ्रष्ट न कोणी जन्मे, जन्माकडे नसे बोल
दुर्मन अविवेक परी, त्याचा दे दुष्कृतीकडे झोल २८
दृढ मन दुःखातिशयीं, कुरकुर न करी कधीं न तो डगतो
दुर्बलमनस्क अल्पहि दुःखावांचून सतत कुरकुरतो २९
मन मोकळें असावें, परंतु अगदींच उथळहि नसावें
होऊं द्यावें ऱ्हद्य न कारण नसतां परास तें द्यावें ३०
रोग शरीरीं झाला, औषध कांहीं तरी मिळे त्यास

रोगास मनाच्या परि, न औषधें ये बरें करायास ३१
ठेवावया न येतें, रिक्त मना जागृतींत केव्हांही
न तयांत शिरूं द्यावे, होईल अपाय ज्या विचारांहीं ३२
होउनि मनोविकारा वश पावावें असेव्य सौख्य जनीं
शतपट संसेव्य मिळे, त्यापेक्षां अधिक आत्मसंयमनीं ३३

## आत्मा.

देह क्षेत्राचा धनि, आत्मा मानव कृषीवल गणावा
सद्गुण पिकवुनि कष्टें, नरजीवनहेतु युक्त साधावा ३४

## धर्म.

धर्म न कर्मा-वांचुन सुखकारक फल–विहीन पादप तो
मूलरहित तरु धर्मावांचुन कर्तव्य उपडुनी पडतो. ३५

## स्वर्ग.

आनंदसुख यथास्थित, दुःखाचें नांवही नसे ठावें
दुःखांतूनच तेथें, लहानथोरास लागतें जावें ३६

## दैव.

दैव असो असलें तर, बुध परि म्हणतात उद्यमाधीन
उघडे आपोआप न, राजी वा आळशावर कधीं न ३७
स्वातंत्र्यप्रिय मानव, न रुचे परतंत्रता न सुख तींत
त्यानेंच दास व्हावें दैवाचें काय हें न विपरीत ३८
चातुर्य युक्ति गुण धी–बल असुनी एवढें मनुष्यांस
थोडें तरी न कां ये, हटवायाला तयास दैवास ३९
दैवावर न रुसावें, जें देतें तें न वाटतें पुरतें
शांति मनांत जयाच्या, पुरून थोडेंही त्याजला उरतें ४०

## माता पिता.

ईश्वर सकल जनांचा जनिता आहे परी जनक जननी
यांसम अन्य न दैवत. वंद्य जगीं हा धरीं विचार मनीं ४१
करितो पितरांची जो सेवा तो ईश्वरास मानवतो
वंद्य स्वापत्यातें स्वोदाहरणें न काय मानव तो ४२
सेवा कितीहि केली, पितरांचें ऋण तरी न तें फिटतें
पुत्र कृतघ्न तरि ही, शुभ चिंतिति ते तया न मन विटतें ४३
शिशु करिता कष्टींही मानी आनंद एक जननीच
अवमानितो तिला जो तत्सम दुसरा नसेल जन नीच ४४
प्रत्यक्ष ईश्वराची वंद्य अनुज्ञा तशीच पितरांची
शब्द न उल्लंघावा त्यांचा ही साधुरीति स्वहिताची ४५
परिपालनकारण जी जननीची धन्य धन्य ती ममता
न प्रेम अन्य एकहि समर्थ पावावयास तत्समता ४६
शब्दें वा आचरणें मन पितरांचें कधीं न दुखवावें
सुख त्यांचें तेंच खरें सत्पुत्रें आपलें सुख गणावें ४७
सेवा पितरांची हा मनुजाचा मुख्य धर्म मानावा
संपादितो न जन नच पात्र प्रभुच्या कृपेस तो व्हावा ४८
पितरांनीं साधावें संततिचें हित तसेंच संततिनें
रिझवावें पितरांतें प्रगट करुनियां कृतज्ञता कृतिनें ४९
जेणेंकरून होइल पितरांचा तोप तोच पुत्राचा
धर्म खरा, तेंच खरें हित समजे तोच एक सुत साचा ५०
करिती पितरांची जे सेवा देवासमान त्यां भजती
सन्मान्य जनीं होती, स्वर्गींही पावतात ते सुगती ५१

## कर्तव्य.

जावें करीत निष्ठापूर्वक सोल्हास नित्य कर्तव्य
ज्याचें त्याच्या हातीं आहे म्हणतात साधु भवितव्य ५२
घ्यावा करून न वृथा परमेश्वरगुह्यशोधनें त्रास
गुह्य न कळलें न कळो, न टळे कर्तव्य आचरायास ५३
कर्तव्य मोह एकहि दुःखद अनिवार्य सर्वथा नाहीं
दुष्कर विवेक निग्रहबलास आहे न ह्मणवतें कांहीं ५४
स्थित्यनुरूप करावें कर्तव्य खरी कृतार्थता त्यांत
केवळ कर्तव्यें जन झाले होतील वंद्य जगतांत ५५
व्यत्यय कर्तव्यांत न येऊं द्यावा धनार्जनें अगदीं
आले आड नग तरी त्यांतूनहि वाट काढितेच नदी ५६
कार्योपक्रमयत्नच कर्तव्याचें असें प्रमाण खरें
यश अपयश न गणावें काय करावें जिथें उपाय हरे ५७
मी घातलें न जन्मा माझें मज कवण निर्मिता आहे ?
कर्तव्य काय माझें ? प्रश्न विचारेंच सोडवावे हे ५८

## सत्य.

सत्यें न जगीं चाले, त्याचे गावो किती कवि पवाडे
सत्यचि शाश्वत, अनृतें धुळीस मिळतील उठविले वाडे ५९
इहपरसुख साधाया साधन सत्याविना दुजें नाहीं
हित व्हावें तर भावें त्याला सर्वस्व आपलें वाही ६०
मन सुप्रसन्न, हृदयीं भूतदया, विनय वर्तनीं बरवा
सत्यास्तव कोणाची न करावी निश्चयें कधीं परवा ६१

सत्य पुरें आदरिलें सर त्याची सार्वभौम नृप न करी
मन सुप्रसन्न ढाळी त्यावर संतोषशांतिची चवरी ६२
न्यायानुसार जनमन राखावें त्यांत कोणता दोष
परि सत्यपालनास्तव झाला होवो खुशाल जनरोष ६३
भीड धरून पराची मन न असत्याकडे वळूं द्यावें
ज्याचें त्याला त्यानें लागे इतरांस पाप न भरावें ६४
सत्यावलंबनींही लोकमताला धरून चालावें
सौजन्यें वागावें लोकीं ह्मणवून ह्या भलें घ्यावें ६५
सत्य विचारीं वचनीं आचारीं सत्य सर्व सत्यमय
आहे दिलेंच देवें समजावें त्यास सर्वदा अभय ६६
सत्याकरितां एका गेला आनंदरहित मार्गानें
थकतां न भागतां वा जन्माचें श्रेय मिळविलें त्यानें ६७
सत्यन्यायें वागे, त्याच्या मार्गीं कधीं न ये धोका
देव तया सांभाळी, दुर्दैवाचा बसूं न दे झोका ६८

## सद्वर्तन.

न प्राणासम अन्य प्रिय मनुजा त्यास तो किती जपतो
तत्सुखसुस्थितिकरितां न गणून क्लेश यातना खपतो ६९
खपतो परि मूर्खत्वें, भ्रमतो जीवनसुखा फुका मुकतो
अधिकारी न सुखाचा होतो सद्वर्तनीं चुके नर तो ७०
ढंग दुराचाराचे येतील कशाहि ते गयाळास
सद्वर्तनपरिपालन कठिण व्रत फार आचरायास ७१
सद्वर्तनीं खरें सुख, न दुराचरणीं मिळेल तें तुजला
वाटे लाभे पुढच्या दुःखाचा तें अखंड मोबदला ७२

सद्वर्तनास लागे वेंचावें पदरचें न गांठोडें
तरि घात आत्महस्तें करिती जन दुर्विनीत कां थोडे ७३
न कधीं विरोधभावें करणें वर्तन बरें निसर्गाशीं
जातां उलट तयाच्या, जिरतो मद खोड मोडते खाशी ७४
सदसद्विवेकसंमत न असें वर्तन बळें करायाचें
परिणामीं भोगावें लागे न चुके कदापि फळ त्याचें ७५
अन्य करो नाश परी आपण होऊन आपला करिती
नवल दुराचारी जन दुर्गतिचा मार्ग आदरें वरिती ७६
करितील जन करूं द्या उपहास तुम्हास तेच भजतील
पाहुन वर्तन तुमचें विशुद्ध अकपट तसें सहनशील ७७
आनंद सदाचरणें होतो तो नित्य सारखा टिकतो
सोडुनि नश्वर दुसरें ज्ञाता आनंद त्याकडे वळतो ७८
वळवाया दुमार्गी, पाडाया भूल नष्ट मोह झटे
भुलतां तयास किंचित् हळूहळू दास तो करी कपटें ७९
वर्तन चोख जयाचें कोणाचेंही न त्यास भय वाटे
निर्भय चित्त तयांचें, सदैव जे चालती सिध्या वाटे ८०
आचरण शुद्ध ज्याचें, ज्याच्या चित्तीं वसे समाधान
दारिद्र्य तरि तया दे सुख न तसा नृपवरासही मान ८१

सद्गुण.

सद्गुण उत्कर्षप्रद पाववितीं शांतिसुखनिधानातें
सख्यत्वाचें त्यांशीं जोडावें स्वहितकर बरें नातें ८२
नश्वरसुखार्थ जैसे, सद्गुण जोडावया जरि झटाल
लोकोत्तर जन्माचें कल्याण करून केवढें घ्याल ८३

संवर्धन सुगुणांचें करितां होतील ते समुज्वलभा
तुज वितरितील शोभा, तारागण ज्यापरी सुनील नभा ८४
प्रकट करी गुण अंगीं असेल लोकांत तो प्रयत्नानें
लोकादरास होइल पात्र तुला गौरवील सन्मानें ८५
लागे तसें जपावें न सद्गुणा, दुर्गुणा जसें; शिरती
दुर्गुण मनीं मळविती भ्रम पाडूनि मूळची विशुद्धमती ८६
हानिप्रद होय किती दुर्गुण जरि वाटला मनोहर तो
परिणाम दुःखदायक भोगी अक्षय तयांत जो रततो ८७
दुर्गुण मोहकरूपें ठकवी मन म्हणुन त्याकडे वळतें
खातें गोते पुरेते करीत अनुताप मग पुढें बसतें ८८
कठिण चढण सुगुणाची आक्रमितां सुलभ होतसे तीच
माथ्यावरती गेल्यावर दिसती लोक खालचे नीच ८९
एकाएकीं बहुधा कोणी होई न सद्गुणभ्रष्ट
मूर्ख बळें अवगणितो पुढचा परिणाम जरि दिसे स्पष्ट ९०
बंधन नसतां दुर्गण हवे तसे नाचतील दुःशील
बंधनच योग्य त्यांना नाहीं तरि ते अनर्थ करितील ९१
जो बंधनीं न ठेवी, दुर्गुण लागति तया पतकरावे
दास्यत्व विकाराचें, त्यांनीं स्वामित्व कां न मिरवावें ९२
न कधीं प्राज्ञ स्वशिरीं दुर्गुणभर घ्यावया असे राजी
दुर्गुण मनीं धरावी स्वमुखांची उडविती अवदशा जी ९३
सौंदर्य शरीराचें काळें भंगे परंतु न मनाचें
कष्टणासहि संपादन करितां ये सुस्वरूप सुगुणांचें ९४

दिसते दुरून वरवर सुंदर अंतर परी असे न तसें
अंतर्गुण अवलोकी, वरकांतीनें कधीं न सुज्ञ फसे ९५
ज्याच्या अंतःकरणीं शुचिता सद्धर्म वास करितात
हर्ष समाधानाचीं मधुर फळें त्यास सर्व मिळतात ९६

## सच्छील.

अधिकार महत्पदधन ये न जरी मिळवितां समस्तांस
सद्गुण साध्य मनाचे तरि नसती इच्छिल्यास कोणास ९७
थोड्यांनांच महत्कृति करितां येईल दैवबुद्धिबळें
सच्छील सदाचारें वर्ताया तरि न पात्र कां सगळे ? ९८
ज्ञानगुणें लोकांचें येतें वळवावयास चित्त परी
महती सच्छीलाची अपूर्व तें त्यास आपलेंच करी ९९

## सुख.

परदुःखें स्वसुखाचा लाभ घडावा ह्मणून जे झटती
करणीनें विपरीत स्वयेंच दुःखीं असह्य ते पडती १००
सुख इच्छितात सगळे, वर्तन उलटें तथापि करितात
वर वर सुखार्थ करिती यत्न चढाया परंतु पडतात १०१
दुःखस्वरूप दिसतें बहुधा मूलांत मधुर सुख हो तें
उपयोगविपर्यासें पीडादायक परंतु तें होतें १०२
सुख संपदेंत न वसे, मात्र मिळे एक तें समाधानीं
आहे वितृष्ण मन तरि, तें कसल्याही स्थितींत सुख मानी १०३
परतोषीं स्वसुखाचा लाभ घडे सुलभ यत्न साध्य नरा
परसुख राहो स्वसुखास्तव ठेवावें ह्मणून हृष्ट परा १०४

जेणें होइल जागृत दुःखाचें स्मरण गोष्ट टाळावी
आनंदसुखाची भर संगति संभाषणांत घालावी १०५
सुखसर्वस्व न मानी ऐश्वर्यविलास भोगरंजन तें
नित्य क्रमांतराला उपयोगी थोडकें जरी पडतें १०६
सत्य सुखा सेवावें, पुष्कळ परि फसवितो सुखाभास
जल अन्य तृषा शमवी, परि मृग भुलती भ्रमें मृगजलास १०७
सद्यः सुखदायक तें, तितक्यापुरतेंच मात्र शाश्वत तें
त्यास न फार भुलावें, अतिरेकें मन तयासही विटतें १०८
नीति सदाचाराच्या आड नये तेंच सुख खरें समजा
आधीं सुख भोगावें, फल त्याचें दुःख ह्यांत काय मजा १०९
मागें वळुन पहातां दुःख मनीं भरवितें गतायुष्य
ज्याचें स्वाचरणें तो पुढचें कमती करी सुख मनुष्य ११०
गत गोष्टीचा सुज्ञें ध्यावा हृद्रोग तो न लावून
सुखलाभ घडेल कसा कोणासहि जीवनास उबगून १११
सर्वत्र कार्यकारणभावें सुखदुःख चिकटलें राहे
कीं कारणानुरूपचि कार्य घडे सृष्टिचा नियम आहे ११२
कित्येकांना वाटे कीं सुख कर्मेंद्रियांत सांठविलें
श्रेष्ठ मनोजयसुख तें स्वप्नींहि तयीं नसेल अनुभविलें ११३
सुखदुःखाचा करितो आपण आरोप तें तसें दिसतें
कारण कीं स्वमनाचें प्रतिबिंब तसेंच त्यावरी पडतें ११४
सुखदुःखाचें कारण आहे मन निर्विकार तें ठेव
हीच सुखाची आहे, सोडी भ्रम मानवा खरी ठेव ११५

पुष्कळ विषयांपासून साधक सुख व्हावया अजाणपण
अनृत न हें परि पूर्ण, ज्ञान न दुःखद खरेंच हेंहि पण १११
इंद्रियसुखार्थ मनुजें नयधर्म तशी न नीति सोडावी
उद्भवतां तत्काल स्वांतीं दुर्मति समूल उपडावी ११७
इंद्रियसुख भोगावें, ह्यांतच पुरुषार्थ काय तो सर्व
न गणी, नरजन्माचें जाऊं द्यावें न हें वृथा पर्व ११८
उपभोगांत सुखाच्या आदरिलें पाहिजे विवेकाला
त्यावांचून सुखाचा केव्हांहि गोड शेवट न झाला ११९
सुख ज्यास हवें त्याला दुःख सहायास पाहिजे शिकलें
दुःखावांचुन नुसतें सुख कोणाला कधीं न सांपडलें १२०

## दुःख.

दुःखें अनिवार्य जरी येती टाळावयास मनुजास
पुष्कळ अंगावरती घेती ओढुनि बळें परी त्यांस १२१
थोडे सुखकांचनरज दुःखाच्या वालुकेंत सांपडती
दुःख सहावें लागे, जरी सुखाची असेल आवड ती १२
एकेक क्षण दुःखीं घालविला मोजितात जन शतदा
वर्षानुवर्ष सुख अनुभविलें स्मरती तसे परी न कदा १२
गढलें स्मरणीं दृढ तें उपडाया दुःख फार जड पडतें
सुख देईना भोगूं, स्मरणच त्याचें पदोपदीं नडतें १२
हृदयावरती धैर्यें दुःखाचा असह भार तोलावा
सच्चित्स्वरूप भावें चित्तीं चिंतून दूर फेंकावा १२
कर्माच्या सांपडलों आपण आहोंत इंद्रजालांत
कर्मविपाकें घेतों आपण पाडून कां न दुःखांत १२

घात परानें केला, होईना सहन जीव तळमळतो
भुलतो अशाश्वताला, सुखास शाश्वत म्हणून अंतरतो १२७
मोठीं अनिष्ठ गमती दुःखें जी लागती सहायास
जगदीशकृपेनें तीं परंतु होतात कारण सुखास १२८
जें वांट्याला आलें सोसावें दुःख तें मनें शांत
सुख एक समाधानीं, त्याहुन दुसऱ्या मिळेल न कशांत १२९
पश्चात्ताप जयाचा होईल असें करूं नये कर्म
कमती दुःख कराया ठसवावें हें मनीं पुरें वर्म १३०

## ज्ञान.

पुष्कळ शिकावयाचें आहे मनुजास जन्मपर्यंत
आयुर्मति अत्यल्प, ज्ञानाचा कोण पावला अंत १३१
सद्व्यय आयुष्याचा प्रथम करायास पाहिजे शिकलें
सार ज्ञानाचें हें कविवचनीं अमृतमय असे भरलें १३२
विस्तीर्ण ज्ञानाचा भरला सागर तळीं किती रत्नें
मिळतील त्यांतलीं जीं मिळवावीं थोडकींच तीं यत्नें १३३
कोण विचित्र प्राणी मनुष्यपुतळाच की विसंगतिचा
ज्ञान असून करीना सद्व्यय त्याचा तसाच सन्मतिचा १३४
संपादावें लागे ज्ञान मिळे आयतें न त्या भारी
श्रम लागती, न मिळतें वेचून द्रव्यराशि बाजारीं १३५
गुरु लागतो करावा, परि ज्याचें त्यास लागतें व्हावें
त्यावांचून ज्ञानें त्याच्या हृदयीं कसें प्रकाशावें १३६
सर्व धनीं म्हणती कीं श्रेष्ठ असे ज्ञान भय न चोराचें
घेतां न सक्तिनें ये, न सरे देतां न वर्णवे वाचे १३७

स्पृहणीय वस्तुंमध्यें ज्ञानासम एकही अभीष्ट नसे
ज्ञानरसाची अभिरुची तो पावे तृप्ति काय अन्य रसें १३८
जीवन साधनच नव्हे, ज्ञान तरी देह सार्थकीं लावी
अज्ञानाला त्याची महती कोठून जाणतां यावी १३९
विद्येनें ज्ञानाचा लाभ घडे ज्ञान मनुजता आणी
ज्ञान वसे आनंदीं तेथें सुखदेवता भरी पाणी १४०
व्यापार ज्ञानाचा, दुसरा एकहि तसा नसे मोठा
सोसावा कोणाला त्यांत कधींही न लागतो तोटा १४१
ज्ञान मना आकळितें, इकडे तिकडे चळूं न दे त्याला
मन उच्छृंखल होतां प्रवृत्त होऊं न दे अकार्याला १४२
थोडेंच व्यवहारीं पडतें कामास पुस्तकी ज्ञान
कर्तव्य न करवी जें ज्ञान नव्हे तें खरेंच अज्ञान १४३
उपयुक्त ज्ञान खरें, परंतु आकलनशक्ति त्याहून
ती अंगीं नसली तर फळ काय ज्ञानभार वाहून १४४
ज्ञानांतून करावी द्रव्याची शुद्ध निवड हितकर ती
जें दिव्य तेंच घ्यावें, कशास किरकोळ पाहिजे भरती १४५
वस्तु क्षुद्र न एकहि, बोधप्रद ती कितीतरी होते
शोधन केलें असतां, विचार न करी परंतु मन कोतें १४६
भर घालून ज्ञानीं, वयमानें वाढवीत तें जावें
वृद्ध नव्हे जरठचि तो, नर जो न ज्ञानवृद्धता पावे १४७
इच्छा प्रबल असावी, रोध ज्ञानार्जनास न करील
निर्धनता संपोषक साधक उलटी तदर्थ होईल १४८

न खरें केवल शाब्दिक संस्कृत होई न मन जयें ज्ञान
खोल जलांत बुडविला तरि आंतुन कोरडाच पाषाण १४९
ज्ञानाचा ओनामा सुदृढ जगन्नायकीं खरा भाव
सत्य ज्ञानें कळतें, उत्तम लोकांत तेंच दे ठाव १५०

## शिक्षण.

शिक्षण आयुष्याचा घेतां उपभोग यावयास हवें
ज्ञानाचें साधन तें, मन संस्कृत एकटेंच त्या करवे १५१
मनुजास शिक्षणें ये मनुष्यता मूर्ख पात्र तें टाकी
पाषाणाला लागे मूर्तीचें रूप यावया टाकी १५२
ज्यावर न शिक्षणाचा घडला परिणाम काय मानव तो
जगला पुष्कळ तरिही अज्ञानी व्यर्थ जन्म घालवितो १५३
जो आद्य शिक्षणाचा अविचारें व्यर्थ काल घालवितो
पावे अनुताप पुढें, स्वकरें माती सुखांत कालवितो १५४
बालवयांत न झालें शिक्षण अवघड पुढें पडे भारी
वेळींच कार्य केलें होय पहा नित्य तेंच सहकारी १५५
शिक्षण नव्हेच लेखन वाचन हीं त्यास साधनें होती
नुसत्या न भोजनाच्या साहित्यें तृप्ति भोजनीं हो ती १५६
केवळ व्याकरणानें अन्वयरचना कळेल इतकेंच
हृद्य न कळे न आला अर्थाचा उकलितां जरी पेंच १५७
कर्तव्याची लागे योग्य दिशा शिक्षणें खरें तेंच
टाकून निरुपयोगी उपयुक्त ज्ञान तेवढें वेंच १५८
दुसऱ्यापासुन शिकतां आपण होतें स्वशिक्षणें दृढ तें
मननविचारें अभ्यासित सार मनांत पूर्ण तें गढतें १५९

इच्छा असो नसो वा, शिक्षण असतेंच चाललें सतत
परि तें असें असावें, कर्तव्याला करील जें मदत १६०
गुरुशिक्षेनें केवळ सत्यज्ञानांत भर पडेनाच
पद न स्वयें हलविलें तरि येइल काय शिकविला नाच १६१
चरितार्थसाधनास्तव शिक्षण संपादिलें तरी न खरें ;
तें ज्ञान काय पुरवी, नरजीवनहेतु मात्र उदर भरे १६२
शाळेंत अनुभवाच्या सर्वांसच लागतें शिकायास
सन्मति सत्वर उमजे पडती मूर्खास फार आयास १६३
येई न तें शिकाया, मूर्खच राहील जो मनीं लाजे
लाज धरी न शहाणा, येतें न शिकावयास त्याला जें १६४
शिक्षण हृदयीं पेरी बीज ज्ञानें समृद्धि त्यांत भरे
किति वेंचिली तरी ती आजन्म पुरे उरे कधीं न सरे १६५
सृष्टि प्रज्ञा आत्मा अभ्यासावेत उत्तम ग्रंथ
हे तीन मनोभावें स्वर्गाचा आक्रमावया पंथ १६६

## वाचन.

वाचनमननावांचुन नुसतें ह्मणवे खरें न अध्ययन
अनुभवसंस्कारानें ज्ञानाचे दिव्य उघडती नयन १६७
वाचन हें ज्ञानाचें साधन उत्कृष्ट सुगमही साचें
अगदीं सुलभ नव्हे तरि मननावांचून काय कामाचें १६
मनन नव्हे सोपें तें, हवी करायास बुद्धिमत्ताच
ती देणगी प्रभूची, व्यर्थ न अभ्यास होय तरि साच १६
वाचन वस्तु अशोधित, शोधावी, ती करून मनन मनीं
निवडून तत्व घ्यावें, काढावें सार काय कविवचनीं १७

जें वाचावें त्याचा हृदयावरती ठसा उमटवावा
परिशीलनें करावा सुदृढ असा कीं न तो पुसट व्हावा १७१
भाराभर वाचावे ग्रंथ भराभर कशास ते विफल
ग्राहकशक्ति न वाढे, तसाच मतिचा झडे जगी न मल १७२
वाचून काय त्याचा उपयोग जरी कळेल न रहस्य
पठण वनस्पतिशास्त्र-ग्रंथाचें वाढवील कां सस्य १७३
रत्नाकर सर्वांहुन, मोठा त्याचें परंतु जल खारें
ग्रंथाकर त्याहुनही मोठा होतात तृप्त जन सारे १७४
विनमस्कतंत रिझवी, देतें आनंद सर्वकाल मना
सर्वावस्थांमध्यें सादर सेवेंत इच्छितें न धना १७५
मित्रांत मित्र उत्तम, पाठ कशाही न संकटीं सोडी
अमृतासम ज्यामध्यें किंबहुना अधिक त्याहुनी गोडी १७६
संकटरूपी शस्त्राघाताच्या रक्षणीं जसें कवच
ज्ञानांत घालितें भर, जरी स्वयें बोलतें न एक वच १७७
निर्धनिक—श्रीमंतीं भेद न दे सारखेंच सकलांस
अतुल सुख स्वर्गींचा न शके द्याया सुरांसही वास १७८
बहुविधगुणयुक्त असें ग्रंथांचें सर्वमान्य वाचन तें
वांच्यास सुख न येतें दुर्दैव असे दुजें न यापरतें १७९
नृपवैभवसिंहासन, राजमुकुट यांतही न जें सुख तें
सहृदय अकिंचनासहि अभियुक्तग्रन्थवाचनीं मिळतें १८०
जें वाचावें त्याशीं झाली एकात्मता तरीच खरें
हृद्य कळे नाहीं तर अंतःकरणांत तें कसें उतरे ! १८१

नुसतेंच मनोरंजक वाचन होईल कां हितावहरे ?
साखर गोड तरी कां नुसती खाऊन तीच पोट भरे ? १८२
उपभोगायास मिळे ग्रंथीं उत्तम विचारसाम्राज्यीं
जें सत्य सत्य सुख तें न मिळे लटकें तसें मनोराज्यीं १८३

## विचार.

क्षुल्लक कसेंहि असलें कार्य विचारेंच तें तरि करावें
लागावें अनुतापें ह्मणजे न पुढें कधीं हळहळावें १८४
वारंवार करावा होउन गेलें विचार तरि त्याचा
घ्यावा बोध जपावें न चुकावा कीं पुढें पथ हिताचा १८५
आधीं विचार पुरता करून कार्यास हात घालावा
आरंभ चांगला कां शेवट त्याचा तसाचि न घडावा १८६
शोकें गतगोष्टीच्या लाभ न घडला प्रमाद गुरु समज
त्याचा विचार करुनी चुकलें कां वा कसें मनीं उमज १८७
सारासार विचारें तें सुख कीं कःपदार्थ वाटेल
भावी कल्याणाचा जेणें पीयूषसिंधु आटेल १८८
कामांत कोणत्याही करीत जावा विचार दूरवर
कर लाविलाच तरि तें पुरतें कर व्हावयास सौख्यकर १८९
अवसान पाहिल्याविण अवघड कार्यास घालितां हात
लागे फशीं पडावें, सोसावा लागतो तसा घात १९०
ऐकावें पुष्कळ परि, बोलावें थोडकें विचारेंच
ज्याचा उपयोग नसे शब्द असा एकहि न वृथा वेंच १९१
छिद्रें पडूं कसरही लागूं द्यावी कशास न, धनाच्या
मार्गें ह्मणून जावें नीट बरें एक सद्विचाराच्या १९२

व्यर्थ विचार खरोखर कृतिरूपानें न जो फळा आला
वर्षावाविण होतो मेघाचा लाभ काय शेताला ? १९३
प्रतिपक्षाचें ध्यावें आधीं जाणून सर्व अवसान
युक्तायुक्त विचारें वर्तावें कीं न होय अपमान १९४

## प्रमाद.

टपले प्रमाद असती अवसर साधावया जसे बगळे
टाळावयास त्यांतें ठेवावें लक्ष त्यांवरी सगळें १९५
क्षम्य प्रमाद आहे न कळत घडला न पाप तें ह्मणवे
बुद्धया मिटून डोळे पडणें खाचेंत कां तरी बरवें १९६
सद्बुद्धीचें घ्यावें अनुमत टाळावया प्रमादातें
करुनि तसेंही घडला तीरे नाहीं मनुज पात्र दोषातें १९७
चुकणें आहे मानवधर्म तयाची करूं नये खंत
न चुके केव्हांही जो तो न सुधारेल जन्मपर्यंत १९८
लागून वेळ पडती प्रयास भारी चुकी सुधाराया
कार्यांत दक्षतेनें अवकाशच दे न तीस शिरकाया १९९
झाला विलंब होवो परि आरंभीं चुकूं कदापि नका
आरंभीं थोडेंसें चुकलें न लहान दे तरी हिसका २००
घडला प्रमाद न कळत त्याचा परिणाम तरि न टळणार
न कळत अग्निस्पर्शे चरका न करास काय बसणार २०१

## आयुष्य.

आयुर्व्यय कोणाला करावयाचें कळे न सुकृतींत
जन्म तरी कां थोडे, दुश्चरितें मिळवितात मातींत २०२

स्थिति कोणतीहि नाहीं सुखद सुखाचा झरा सदुद्योग
योग श्रेष्ठ खरोखर, आयुष्याचा असे सदुपयोग २०३
कालसमुद्रीं मानवजीवननौकेस सोडिलें आहे
सद्वर्तनकर्णें ती, इष्ट स्थल पावते सुखें पाहे २०४
संपादावी आत्मोन्नति जीवनहेतु हा मनिं धरावा
धैर्यानें नेटानें उल्हासें पंथ आक्रमित जावा २०५
इच्छा मनीं धरावी यत्न करावा मधें न सोडावा
संपादावें हित निज, जीवनसाफल्य लाभ जोडावा २०६
सुदृढ शरीरीं असतें मनहि तसें सुदृढ तें नसे दुबळें
जीवनसमरयशाचा हार अशांच्या गळ्याकडेस वळे २०७
तारुण्यांत जपे जो वार्धक्य तया न फारसें जाचे
हाल अपेष्टा टळती, नसले त्याचे जरी दिन सुखाचे २०८
घेतां येइ सुखावह आयुष्य करून मानवा सकल
इच्छा मात्र असावी लागे त्याला तशी परी प्रबल २०९
काबाडकष्ट करणें आलें वांट्यास जीवनाकरितां
येवो परंतु जावा अज्ञानीं योग्य काय जन्म रिता २१०

## काल.

सत्कृत मुद्रित केल्यावांचुन जाऊं न काल द्यावा हो
स्कंधावर तो तुमचा उद्यमयशभार सर्वदा वाहो २११
वेळांत वेळ काढुनि थोडें तरि तें नवें शिकावेंच
प्रत्येक दिनीं आहे काल अमोल न तया फुका वेंच २१२
लागूं द्यावें काळा पाठीस न आपल्या स्वयें पाठ
त्याची पुरवावी हा ग्राह्य दिसे सर्वदा भला पाठ २१३

अनुकूल काल येतां सत्वर उद्दिष्ट कार्य उरकावें
फळ काय मिळेल मनीं ह्याची तळमळ करीत न बसावें २१४
धीर धरावा चित्तीं केव्हां तरि हेतु सफल होईल
अनुकूल संधि येतां कार्य न झाल्या–शिवाय राहील २१५
वेळेला जें होतें दुसऱ्या वेळीं तसें न ये करितां
काल उचित कार्याचा आला जाऊं न दे ह्मणून रिता २१६
टिक् टिक् घड्याळ करितें वेळ पळे सदुपयोग कर सांगे
उत्कृष्ट पावतो फळ वेळेला दक्ष राहुनी जागे २१७
वेळीं योग्य करावें कार्य बिघडतें उशीर झाल्यास
सुकल्यानंतर पुष्कळ कुटून रस कां निघेल पाल्यास २१८
न उद्यांवरी विसंबें जें झालें आज तेंच मात्र खरें
होई न आज ज्याला कार्य तयाचें जसें उद्यां न सरे २१९
दिन मोठा कार्याला साधन व्हायास प्रातरुत्थान
उशिरा उठतो त्याला दिन न पुरे घे करून नुकसान २२०

## सात्विकता.

ज्ञानाशीं संमेलन सात्विकतेचें किती मनोरम तें
लावण्याचें लोको-त्तर तेज तयापुढें फिकें पडतें २२१

## संगति.

निर्मल असेल त्वन्मन, तसेंच आचरणही पवित्र खरें
दुर्जन संगतिपासुन दूर रहावें तथापि हेंच बरें २२२
संगति अशी असावी कीं जी सद्गुण मनीं उपजवील
दुर्मार्गास घसरलें पद सन्मार्गाकडेस वळवील २२३

परिणाम संगतीचा सुटती जडती तसेच गुणधर्म
करितांना संगति हें धरिलें लक्षांत पाहिजे वर्म २२४

## विद्या.

विद्या साध्य न झाली टाकावीं साधनें न तोवर तीं
नाहीं विद्या नाहीं साधन ते संकटी पहा पडती २२५
विद्याव्यसन जयाला विपत्ति त्याची मनोरमा भार्या
दुःखक्लेश निवारी सादर सेवेंत राहते आर्या २२६
मान धनाचा होवो पुष्कळ लोकीं तसा बडेजाव
विद्वत्सभेंत विद्वान् मान अधिक पावतो न तो राव २२७
दानांत दान विद्यादान खरें श्रेष्ठ तेंच मानावें
परलोकींही दुर्लभ विद्येनें जें मनुष्य सुख पावे २२८
विद्यार्जनार्थ केले श्रम ते वायां कधीं न जातील
संपत्ति मिळो अथवा न मिळो साधन सुखास होतील २२९
विद्या कंठीं कंठीं ज्याच्या दुःखीं न तो दिवस कंठी
पाठीशीं शांति वसे दुर्दैवें जरि करांत करवंटी २३०
विद्यादेवीची जो सद्भक्त उपासना करी भावें
होते प्रसन्न त्यावर तेव्हां तो तत्प्रसादफल पावे २३१
विद्याव्यसनपरायण शोधक शास्त्रज्ञ आणि तत्वज्ञ
देशहितास्तव खपले स्वशिरीं चढलें करी ऋण कृतज्ञ २३२
रवि तेजस्वी आहे तेज तयाचें परंतु दिवसाच
विद्वत्तेजाविलक्षण केव्हाही सारखेंच तें साच २३३

## वचन.

विश्वास दिल्यावरती आलें प्राणावरी तरी नढळे
तो धीर सत्यवचनी नरतो तारी परास वचनबळें २३४

## प्रामाणिकपणा.

नसतां प्रामाणिकता सद्गुण होतात इतर ते फोल
गंधावांचुन सुमना सौंदर्यादिकगुणीं न ये मोल २३५

## आरोग्य.

आरोग्य नच शरीरीं पक्वान्नें काय शक्ति वाढविती ?
दीप्त क्षुधाच पौष्टिक पक्वान्न खरें असें समज चित्तीं २३६
साधेंसुधेंच खाणें नेमस्तपणा पवित्र आचरण
व्यायाम निर्व्यसनता आरोग्य गुणांस ह्या रिघे शरण २३७
मेंदूस कार्यसाधक देहेंद्रियबल ह्मणून त्यास जपा
होईल क्षीण न तें जेणेंकरुनी असे खुशाल खपा २३८
आत्मोन्नतीस साधक देहाचें सत्य होय आरोग्य
रुचती सुखकर होती त्यावांचुनि नच पदार्थ उपभोग्य २३९
आरोग्याचें आहे करणें कर्तव्य आपलें जतन
इहपरलोकींचें तें साधन मिळवावया असे वतन २४०
सृष्टिक्रमानुसार न वर्तन घडतें ह्मणून रोगास
अवकाश मिळे देहीं पाळावें ह्मणुनि सृष्टिनियमास २४१
भयदुःखरागमत्सर इत्यादि मनोविकार आरोग्य
बिघडविती रोधावें विवेकदंडें तयांस हें योग्य २४२
असतां स्वस्थ प्रकृति प्रसन्न मन विश्रमे प्रमोदांत
बिघडूं द्यावी न कधीं, राखावें मन तसें सदा शांत २४३

प्रकृतींत विकृति शिरली ह्मणजे जीवास वाटतो त्रास
आरोग्यें स्वहितास्तव सांभाळावें ह्मणून देहास २४४

आरोग्य शरीरीं तर सत्कृत्यें पुण्य जोडितां येतें
हरकत काय ह्मणाया यास्तव आरोग्य मुक्तिपद देतें ? २४५

पोटापुरतें खावें अन्न सुखें तें तुह्मास वाहील
तुमच्याकडे तयाचें अधिकत्वें वाहकत्व येईल २४६

आरोग्याचें साधन मोठें सर्वांत कीं मिताहार
त्यायोगें रोगाचा लागे न करावयास परिहार २४७

बहुतेक सर्व दिसतें रोगाचें मूलबीज अन्नांत
न्यूनान्नें ज्या टळती अधिकान्नें त्या उपाधि जडतात २४८

कमतीच दोन खावे घांस बरे अधिक जाच करितात
जे दोन अधिक झाले वैद्याचें तेच पोट भरतात २४९

अधिकान्न मांद्य आणी, त्यास कराया सहाय्य आळस ये
कार्योत्साह न राहे, रसनेची भीड ती धरूंच नये २५०

सुखद मिताहार खरा, त्याच्या रसना परंतु ये आड
अन्नास्वादीं लोलुप होतां चालूं न दे तिचे लाड २५१

आहे उत्साह तसा, पुष्कळ आवेशही मिताहारीं
सन्निध सुलभ सुखें नीं दूर अघाशी स्वयें बळें सारी २५२

अंगें कष्ट करावे, मिळवावें बेत राखुनी खावें
नियम असा जो पाळी, रोगाला त्यास लागतें भ्यावें २५३

औषध रोगास हवें संभव त्याचा मुळांतच खुडावा
हेतु मिताहारें हा कोणासहि सहज साधितां यावा २५४

असली शरीरसुस्थिति तरिच मनोगुणविकास होईल
आरोग्यावांचुन सुख नच सारा जन्म व्यर्थ जाईल २५५
आहार श्रम निद्रा वेताचीं औषधें गुणोत्तम हीं
प्रति दिवशीं नियमानें सेवी बाधे न रोग त्या लवही २५६
लौकर निजतो उठतो शक्तिश्रीज्ञान हो प्रसन्न तया
जीवन यश त्यास मिळे, भाग्य तयाचें कसें नये उदया? २५७

## व्यायाम.

अन्नासम आवश्यक देहा व्यायाम सुदृढ तो बनवी
क्षीण मनाचा हरि तो चढवी उल्हास दे उमेद नवी २५८

## उद्योग.

उद्योग भव्य भव्यप्रद सुरुचिर दैवमंदिरद्वार
उघडूनि आंत गेल्यावर लाभे चिरसमृद्धिसुखमार २५९
उद्योग तीक्ष्ण आहे दैवाश्वाचा लगाम कांटेरी
धरुनि करीं वर बसतो, आजन्म तया न अवदशा घेरी २६०
जीवनकलह नभावा हानि पराची जयें घडेल असा
त्यांतच तुष्ट रहावें उद्योग जें मिळेल मूठपसा २६१
अवघड मार्ग धनाचा उद्योगं नित्य आक्रमित जावा
थोडें जरी मिळालें धीर नराचा कधींहि न खचावा २६२
श्रीमंती कोणाच्या हातीं आहे असें जरी न म्हणा
जीवन संपादाया तथापि येई न उद्यमें कवणा २६३
गोष्टी अनेक एका वेळीं केल्यास एक ही पुरती
साधे न, साध्य एकच पुरी करावी नको वृथा भरती २६४

धंदा पतकरिला जो त्याला चिकटून पाहिजे असलें
त्याची करी उपेक्षा तोही त्याची करील हें ठरलें २६५
उद्योगाची आहे देवानें मानवा दिली खोती
नीट न सांभाळी जो त्याला देईल चांगला खो ती २६६
जो काळ आळशाला सरतां न सरेच दीर्घ जड वाटे
उद्योग्याला परि तो पळतो कळतें न कोणत्या वाटे २६७
वागून दक्षतेनें उद्योगाची न सोडितो कास
लक्ष्मी प्रसन्न त्यावर ईप्सित तें सर्व पुरविते त्यास २६८
आहे श्रमीं मधुरता आणी ती भाकरीस जी गोडी
जो आळशी तयाच्या पक्वान्नालाहि तिजहुनी थोडी २६९
टाळाटाळी करितो कामाची थोडक्या श्रमासाठीं
पुरते तया थकविती त्याच्या जे कष्ट लागती पाठीं २७०
उद्योगाची किमया करिते स्वगुणें सुवर्ण मातीस
कमती काय तयाला ज्यानें साधून घेतलें तीस २७१
प्रोत्साहन सुफलाची आशा दे कष्ट बहु करायास
तेणें कितीहि पडले मनुज असे सिद्ध ते सहायास २७२

**आळस.**

मूर्ख स्वकरें निजहित केवळ निष्काळजीमुळें दवडी
आळस कोणतरी हा ठार बुडाला तरी उठे न गडी २७३
जो आळशी स्वताला उठवी न तयास देवही उठवी
दुःखीं कष्टीं त्याला देव तसें दैवही सदा बसवी २७४
जो आळसांत पडतो लोळत विपदा तयावरी लोळे
न सुटे आळस न उठे दुःखज्वलनें शरीर जरि पोळे २७५

## धंदा.

धंदा न कोणताही मानावा नीच जीवनाकरितां
त्यास प्रामाणिकता उन्नति देते यथार्थ आदरितां २७६
श्रेष्ठ करावें आपण धंद्याला आपल्या सचोटीनें
नांव नये मिळवाया खोट्यानाट्या जगीं खटपटीनें २७७
धंदा प्रत्येकाला एकादा पाहिजे तरी आला
भूषण राहो, पडतो परंतु वेळेस तोच कामाला २७८
वारंवार बदलणें धंदा जो एकवार पतकरला
सहसा न आदरावा मार्ग हिताचा न हा नव्हेचि भला २७९
सोडून एक धंदा दुसरा तिसरा करावया सजतो
धंद्यांत कोणत्याही धरसोडीनें अशा न तो चढतो २८०

## व्यवहार.

धीर धरून रहावें, ऐकावें, लक्षपूर्वक पहावें
ध्यानीं सर्व धरावें, व्यवहाराचें रहस्य जाणावें २८१
रत्नपरीक्षा सोपी, न तशी पारख परी मनुष्याची
व्यवहार मात्र आहे एक कसोटी खरी खरी त्याची २८२
यश उद्यमीं न येतें व्यवहारज्ञान एक जरि नसलें
त्यावांचून निरर्थक होती सद्गुण कितीहि जरि असले २८३

## काटकसर.

मिळवी तसेंच मागें टाकी धन रीति ही सुखास्पद हो
आदरितो न तयाच्या घाली मदनांत अवदशा पद हो २८४
संचय करावयाला न विसंबे चालतां भरभगट
व्यर्थ न आपत्कालीं लागे ध्यायास झोडूनि ललाट २८५

राखी वाणी येतो कामा धनसंचय प्रसंगास
संकट कर्मेंहि असलें, तरि तें चिकटूं न देइ अंगास २८६
मोठीं मोठीं कामें केवळ होतात काटकसरीनें
येतो न उन्नतीला मनुज तसा देश उधळपट्टीनें २८७
काटकसर जो न करी तत्कर आपत्ति आंखडून धरीं
खर्चीं विचार राखी हितमतिनें सदुपदेश हाच करी २८८

## खर्च.

ज्याचा व्यय उत्पन्नाहून अधिक तो स्वयें बुडे बुडवी
खोलांत पाय त्याचा अक्षय ऋणकर्दमीं तया तुडवी २८९
उधळेपणांत भूषण मानी तो शेवटीं फशीं पडतो
आयव्यय सांभाळी दुस्तर भवसागरांत तो तरतो २९०
ऋण काढुन सण करण्यापेक्षां भिक्षाशनत्रपा बरवी
सत्यव्रत न टिकूं दे ऋण मनुजाकडुन अनृत आचरवी २९१
भिनतें सर्व शरीरीं ऋणगरल तसें न एकहि जहाल
मनुज कसाही मोठा असला तरि मांडितेंच तें हाल २९२
काढोंवे ऋण त्याची प्रत्यब्दीं वाढते शिरीं रास
दुष्कर फेड उपजवी मति बुडवायास सावकारास २९३
बुडविति धनिकास किती वर बगला करुनि काढिति दिवाळें
अंतीं तयांस दुर्गति, इहलोकीं जरि कितीहि सुख झालें २९४
प्रत्यक्ष कुबेराचा मितव्ययानें न हात आंखडिला
वेळ कितीसा त्याला संशुष्क करावया धननिधीला २९५

## हिशेब.

उत्पन्न कितीहि असो हिशेब परि ठेवणें हितावह तें
ठेवी न अंधसा तो पडेल कोठें कसा न त्या कळतें २९६

## देखरेख.

काम धन्याचा डोळा करितो त्याचे तसे न कर करिती
दक्ष धन्यास वचकती सेवक तद्भीति मानसीं धरिती २९७

## टापटीप.

जेथून घेतली जी तेथें ती परत वस्तु ठेवावी
गरज पुनः पडली तर तेथें तत्काल ती करीं यावी २९८
जेथें नसे व्यवस्था तेथें सगळाच उघड घोंटाळा
कालापव्यय होतो, हानि घडे सर्वथैव तो टाळा २९९
राखी न तो व्यवस्था न वांचवी वाढवी परी श्रम तो
क्षुल्लक गोष्टीकरितां गोंधळ त्याचा कितीतरी उडतो ३००

## जनता.

जनतेस तुच्छ लेखी अर्थातच तो अनादरापावे
अवमानें तत्प्रतिभा तद्गुण तत्तेज कां न लोपावे ३०१
जनतेची अवगणना उद्भविते शत्रु हेतु अहितास
घातक सुखासही ते, तेणें कंटाळतें मन जगास ३०२
जनममता तुमच्यावर लोटेल सहानूभूति दाखवितां
तम घालवी प्रकाशें सुख दे सर्वांस वंद्य तो सविता ३०३
लोकानुरंजनाची कला जया साधली तया सगळे
धरिती हृदयीं स्वसुखाधिक तत्सुख त्यांस वाटतें अगळें ३०४
सोडुनि युक्त विचारा धरिला जनतोपहेतु तो फसला
आहे काय जगीं ह्या नाहीं लोकापवाद ज्या डसला ३०५

## देशाभिमान.

अभिमान प्रत्येका असावया पाहिजे स्वदेशाचा
जो धर्मनिष्ठ त्याच्या हृदयीं जागृत जसा स्वधर्माचा ३०६
जन्म दिला मातेनें पूज्य तशी मातृभूमी समजावी
सेवा तिची करावी सुख व्हाया उन्नतीस चढवावी ३०७
प्रत्येकावर आहे न फिटेल असें ऋण स्वदेशाचें
कर्तव्य सदाचार व्याज भरायास पाहिजे त्याचें ३०८
तुजकरितां मीं केलें आजवरी काय काय तें पाहे
त्वां अकृतज्ञ असावें देश ह्मणे उचित कां तुला आहे ३०९
ज्या देशीं ज्या धर्मीं जनन तुझें देश धर्म तो जाण
प्राणासम रक्षावा श्रेयस्कर यांत कीर्तियशमान ३१०

## परहित.

कल्याणार्थ पराच्या आत्मोन्नतिमति सदादरा पात्र
तत्व उदात्त करी हें स्वार्थपरायण जना लुलितगात्र ३१

## मोठेंपद.

थोरपद प्राप्त कसें व्हावें अंगांत योग्यता नसतां
यावें पंखावांचुन आकाशीं खगवरा कसें उडतां ३१
श्रेष्ठ पदातें सत्वर चढतां येई कधीं न कोणास
त्याकरितां धैर्यानें सहावया लागतात आयास ३१

## लोकमान्यता.

अस्वार्थबुद्धि सत्यावर निष्ठा जनहितार्थ जो झटतो
सच्छील सदाचारी मानव लोकां कसा न मानवतो ! ३१

## धन.

स्वपरसुखाचें साधन धन एक तया ह्मणून संपादी
आत्मैकबुद्धिनें परि सुजनें त्याच्या भरूं नये नादीं ३१५
साधन एक धन खरें, परंतु सर्वस्व वा नसे साध्य
भजतात मूर्ख त्याला तथापि दैवत गणून आराध्य ३१६
संपादी धन मार्गें टाकी परि परहितार्थ तें वेंच
नकळे वेळ कशी ये गांठीं थोडें तरी असावेंच ३१७
व्यवहारांत तसें धन परोपकारीं न वेंचिलें बुडतें
परदुःख मोचनाचें पदरीं सव्याज पुण्यही पडतें ३१८
धन सत्संपत्ति नव्हे, स्वत्वनिदर्शक तसें नव्हेच धन
स्पृहणीय मनुष्याचें विद्यागुण हेंच मानिती वतन ३१९
तुटतें मित्रत्व धनव्यवहारें अहितकर नकोच करूं
पडतां प्रसंग मागें साह्य कराया नको परंतु सरूं ३२०
दक्ष रहावें कोमल हृदय तसें मनहि शांत संपत्ती
हीच गणी बाधेल न आली असतां कशीहि आपत्ती ३२१
धन असतां जन नसतें नातें हुडकून काढितात बळें
माया वर परि अंतर असतें स्वहितास वाहिलें सगळें ३२२
व्यय आहेच धनाच्या मागें संसार त्याविना न धके
वारंवार तयाचा अभाव देई जना कसे हिसके ३२३
अव्यय धन न बरें तद्व्यय अनुचित होय तोहि न बरा हो
कृपणावांचुन अन्य न कोठारांतच म्हणेल धन राहो ३२४
लौकिक महत्व वाढे पुष्कळ धनसंग्रहीं असे ज्याचे
छळिते इतरा न तशी निर्धनतासाखि विवंचना जाचे ३२५

द्रव्यावाचुन पुरता भूतदयेला मिळे न अवकाश
हृदयीं उचंबळे बहु व्हावें लागे तिला परि हताश १२६
हेमाश्रयें रहाती गुण पुष्कळ दोष सर्वथा लपती
गुण अंगींच्या अंगीं निर्धनतेनें पुरे खरे जिरती १२७
धन केवळ कल्पद्रुम, अद्भुतबल ऋद्धिसिद्धिही त्यांत
साधन सर्व सुखाचें, प्रापंचिक जन यथार्थ भजतात १२८
जो योग्यता धनाची यथार्थ समजे तयास दास करी
न बने दास तयाचा विहरे तन्मन यथेच्छ सौख्यसरी १२९
वित्तव्ययमार्गाला, वळणें वाईट फार असतात
तीं टाळून विचारें सज्जन अस्खलित नीट जातात १३०
ज्ञात्यावांचुन इतरां सुखकारक संपदा न होईल
हाव धनाची ज्याला धन राशींतहि अतृप्त राहील १३१
धन मिळवावें नुसतें ठेवावें साठवून कोठारीं
मूर्खत्व नव्हे कां हें उपभोगाविण न वस्तु सुखकारी १३२
द्रव्य मिळविलें पुष्कळ कवडी कवडी करून तें राही
जिथल्या तिथेंच त्याची मनुज तरी व्यर्थ काळजी वाही १३३
धन कष्टें मिळवावें तें सद्भोगाकडेस लावावें
ऐहिक सुख साधुनिही परलोकसुखास साधन करावें १३४
राजाचाही राजा धन कीं राजा करी तया नमन
तें न नमी राजाला, तत्सम दुसरें जगात ह्या बल न १३५
वेंचुनि पुष्कळ वाढे द्रव्य जपूनिहि कधीं कधीं घटतें
त्याचा कसा करावा व्यय हें सकलां न सारखें कळतें १३६

दानीं परोपयोगीं केलें जें खर्च आपलें धन तें
वायां गेलें न ह्मणे परलोकीं परत तें पुन्हा मिळतें ३३७
संपत्ति दिली देवें ती केवळ एकट्यास्तव न सगळी
वांटा निराश्रिताचा तींत असे तो न साधुजन वगळी ३३८
नश्वर जगांत सारें चंचल संपत्ति दोन दिवसांची
शाश्वत करितां येते सत्कार्यीं लावितां तिला साची ३३९
पैका वेळच ह्मणती व्यापारी परि खराच तो पैका
हो रुपया पै पैनें अनादरावी मिळेल ती पै कां! ३४०
अतिशय संपत्तीनें बहुधा वाटे न सुख परी घटतें
संकट दुष्काळाचें अतिवृष्टीनें न काय ओढवतें ३४१
धुंदीमुळें धनाच्या घसरे विसरे समग्र खल भान
वाटे तया उतरलें स्वर्गांतुन दिव्य धनमद विमान ३४२
धन सुखसाधन ह्मणुनि पुष्कळ मिळवावयास कष्ट करी
होई न तें सुखास्पद आंवरिला हावरेपणा न जरी ३४३
वेळेवर गरजेवर वस्तूचें सर्व मोल अवलंबे
बहुतेक भागवी धन गरजा न तरी तयावर विसंबे ३४४
जवि भुकेनें झाला व्याकुल धरवे न निमिषही धीर
तेव्हां बहुमोलाचें पडतें कामास कां जवाहीर ३४५
आधि धनीं बहु असती, निर्धनतेंतहि कमी परी नसती
न विवंचना करावी लागे स्थिति ती बरी विबुध ह्मणती ३४६

## अतिरेक.

न कशाचाही होऊं द्यावा अतिरेक जाचतो भारी
संपोषी स्वगुणें जें अतिरेकें अन्न तेंच कीं मारी ३४७

## यश.

येईल सर्वदा यश असा भरंवसा मुळींच न धरावा
येतां अयश कदाचित् जीव न दुःखांत तळमळूं द्यावा ३४८
त्रासावांचुन दुर्लभ यश मिळणें कोणत्याहि कामांत
यत्न यशाचें साधन तरि नसती कष्ट थोडके त्यांत ३४९
यश पावला विचारें पुरत्या कार्यास हात घालील
दृढ निश्चयें परिश्रम करून जो शेवटास नेईल ३५०

## स्थिति.

दारिद्र्य श्रीमंती स्थिति यांमधलीच उत्तम गणावी
दुर्गुणपीडा टळुनी जीवनयात्रा सुखावह घडावी ३५१

## दया.

अंतःकरण दयेनें भरलें परदुःख जाणवे त्याला
जाणावया तसें ये तत्त्वज्ञानें न तत्त्ववेत्याला ३५२
ज्याच्या दयेस फुटला अंकुर परदुःख पाहुनी द्रवला
त्याच्याकडून घडते उपकृति निर्धन कितीहि जरि असला ३५३
सामर्थ्य असून जया पीडितजनदुःखवारणीं न दया
दावी प्रसंग पडतां कठोरता स्वस्वरूप तीव्र तया ३५४

## औदार्य.

सामर्थ्य दिलें देवें औदार्य तरी न कां प्रकटवावें
आप्त स्वजनावरती लोभ करावा सहाय त्यां व्हावें ३५
साह्य अनाथा करितो होतो त्याचा ऋणी पहा देव
केल्या उपकाराची त्याच्या पेढींत वाढते ठेव ३५

आस्था स्वापत्यांची निराश्रितांची तशी धरी भावें
तो भक्त ईश्वराचा अभीष्ट त्याचें तयेंच पुरवावें ३५७
दुसऱ्याच्या उपयोगीं पडावया जो परोपरी झिजतो
इह-परलोक-सुखाचें करगत घेतो करून साधन तो ३५८
अल्पहि बहु मोलाचें केलें जें दान सुप्रसन्न मनें
तेणें आल्हाद तसा स्वहितास्तव वेंचिल्या न होय धनें ३५९
दुष्ट कृतघ्न जनांतें उपकृतिनें लाजवून सोडावें
थोर मनानें त्यांच्या सौजन्य प्रत्ययास आणावें ३६०
दीना साह्य कराया कांहीं न दुजें तरी न कां प्रेम ?
आनंद तया वाटे प्रेमें नुसतें विचारितां क्षेम ३६१

## दुष्कर्म.

वाटे लाज कराया अयुक्त जें कर्म चार चौघांत
एकांतीं केलें तरि जाचे हृदयांत हा न कां घात ३६२
जें झालें तें झालें विधिलाहि न अन्यथा कराया ये
दुष्कर्मासि जपावें न घडूं द्यावें ह्मणून सदुपायें ३६३
कांहीं दिवस न फुटलें अकार्य तरि शेवटीं फुटेलच तें
भोगावयास लागे शासन त्याचें कधीं न तें चुकतें ३६४
गोष्ट क्षुल्लक करिते मोठा अपराध उघड लोकांत
होई न उघड तोंवर भय चिंतादहन अक्षय मनांत ३६५

## परस्त्री.

माता तशी परस्त्री समजूनि मनीं तसेंच वागावें
जो सत्य एक-पत्नी-व्रत तद्यश विमल सज्जनीं गावें ३६६

## मदिरा.

मदिरेंत लोभ मोठा दुर्गुण त्याहून अधिक कनकांत
मिळतें तों तों वाढे तृष्णा हो त्यांत शेवटीं घात ३६७
व्यसनच आधीं खोटें मदिरेचें त्यांत सर्वथा खोटें
जडलें ठार बुडाला त्यावर आपत्तरंगिणी लोटे ३६८
जातां उदरांत सुरा प्रज्ञा पडते सवेंच बाहेर
अत्यादरें करी ती मोहाचा प्राज्ञ घे न आहेर ३६९
पडतां गळां सुरा ती बलिष्ठ होतो तथापि लाचार
त्याचे काय वदावे लाजविती मर्कटासही चार ३७०
होय भ्रष्ट न कोणी त्याजकडे तरि सुरेस धाडावें
प्रत्यक्ष मोहिनी ती अजिंक्य तिजला कसें न यश यावें ३७१
शिरली मदिरा तेथुन आशा आनंद शांति पळ काढी
पद नित्य पुढेंच तिचें लागे मग कां न दुर्दशा वाढी ३७२
किति नाडले बुडाले सर्वस्वाला समूळ आंचवले
एका घोटें मदिरे! कोण तुझ्या संगतींत जन तरले? ३७३
करितो जो मदिरेचा अधमाधम दुष्ट नीच सत्कार
स्वगृहीं तसा समाजीं त्याचा सर्वत्रही तिरस्कार ३७४
आवडली ज्यास सुरा त्यास नको बायको मुलें बाळें
सुटतो विचार सारा त्याचें लोकांत होय मुख काळें ३७५
स्मृति नष्ट होय सारी गुह्य न राहे तसेंच सत्य पळे
जन विश्वास न धरिती मन सन्मार्गाकडे मुळीं न वळे ३७६
मानवधर्मध्वंसें क्षणीं करावें कसें पशुसमान
ठावें तुलाच मदिरे, तरी तूझा केवढा जगीं मान ३७७

रुचिगंध मधुर नाहीं क्षुधा हरेना न हो तृषा शमन
न मिळे उलटें जातें धन तरि वळतें सुरेकडेच मन ३७८
आली ओकारीही तरी सुरेची नयेच ओकारी
पुनरपि भक्त प्रेमें झडकरि कंठीं तिच्या मिठी मारी ३७९

## मूर्ख.

सद्बोधाचीं वचनें अवमानिति मूर्ख ते पुढें रडती
घेती बळें करूनी हानि पुढें ये कधीं भरून न ती ३८०
निर्बुद्धाशीं पडतां गांठ तयाचा करी न धिक्कार
मानी जगदीशाचे त्वबुद्धीस्तव मनांत आभार ३८१
मूर्खास प्रत्युत्तर देतो होतो स्वयेंच तोहि तसा
मूर्खच तो सुज्ञानें लावुन त्याला मिळेल काय कसा ३८२
मूर्ख न विचार राखी आवेशीं बोलतो कसें भलतें
भान न राहे त्याचें त्याला भाषण परंतु तें नडतें ३८३
लागूनही न होतो ठेंच शहाणा पुन्हा तसेंच करी
मानवरूपें आला जन्माला पशु खराच भूमिवरी ३८४

## वाद.

स्वमत स्थापन करितां वादीं घडतें वितुष्ट फार जपे
कळलें सत्य उमजलें प्रतिपक्षाला तरी न हार खपे ३८५
कारण होतें केव्हां केव्हां वाचालताच कलहास
टाळावयास जपती लावी सोसावयास उपहास ३८६

## कलह.

सरकारांत न जावें निवडाया न्याय कलह मिटवाया
आलें तयांत यश तरि वेंचे तेणें कमी न धन वांया ३८७

थोडें बहुत मिळालें त्यावें वांटून तें समाधानें
हेंच बरें, दवडावें थोड्या करितां न सर्व कलहानें ३८८
नाश कुलांचाच नव्हे केला ज्यानें अनेक देशांचा
वेळ किती कलहा त्या लागेल करावया कुटुंबाचा ३८९
कलहामध्यें होतो दोघांच्या लाभ मात्र तिसऱ्याला
ज्ञाते ह्यास्तव बहुधा दुरून कर जोडितात कलहाला ३९०

## असत्य.

धरिती न असत्याचें जैसें कां भय जनापवादाचें
सत्यस्वरूप केवळ जगदात्मा विश्वचक्षुही त्याचें ३९१
वारंवार वदे कीं खोटें लोकीं लबाड जो ठरला
विश्वास न ये त्याचा जरी खरें तो ह्मणून ओरडला ३९२
म्यावें असत्यकथनीं सत्य वदाया परी न कचरावें
वचन श्रीरामासम लोकीं सत्यप्रमाण लेखावें ३९३
केला छपवायातें अपराध असत्य त्यास जो जोडी
द्विगुणित पाप करी तो अल्पवयीं ही न दे जडूं खोडी ३९४

## गर्व.

असतील मूर्ख पुष्कळ परि एकच काय तो शहाणा मी
आजवरी कोणाचा टिकला न टिकेल गर्व परिणामीं ३९५
एकाएकीं झालें जें प्राप्त द्रव्य फिरविलें नयन
तेव्हां दोनच बोटें वाटूं द्यावें न राहिलें गगन ३९६
ज्ञानानें वाकावें त्यानें होई न शाहणा ताठ
ताठा अंगीं त्यांच्याकडे फिरवितात सर्व जन पाठ ३९७

अनुदार परगुणाचें मोल खरें त्याहुनी कमी लेखी
सगळ्यापेक्षां मोठी त्याची त्यालाच वाटते शेखी ३९८
गर्वानें हेक्यानें ज्याची त्याला न योग्यता कळते
प्रौढी कितीहि मिरवो तरि त्याला लोक जाणती पुरते ३९९
वैभवकालीं वागे शेजाऱ्याशीं कधीं न तोऱ्यानें
आपत्कालीं व्हावें सहाय तुज इच्छिशी जरी त्यानें ४००

## आत्मश्लाघा.

मोठा दुर्गुण आत्मश्लाघा तो वाढवी प्रतिष्ठा न
लोकीं अपमानाचें मूर्खत्वाचें तसें अधिष्ठान ४०१
मिरवावया बढाई गोष्टी मोठ्या फुशारुनी कथिती
मूर्खत्वें ते आपुली घेती लोकीं करून फटफजिती ४०२
निःसत्व तोच बहुधा दावी वागून डौल ताठ्यानें
पाणी उथळ खळाळे ओढ्याचें गर्जतेंहि मोठ्यानें ४०३

## आग्रह.

सत्यहि विधान असलें तरी तयाचा धरूं नये हेका
न रुचे न पटे इतरां तरि त्यापासून लाभ आहे का ४०४

## अपशब्द.

अपशब्दें नीचत्व प्रकट करावें न योग्य सुजनातें
दाटून घालवावें का राखावें जनांत वजनातें ४०५

## अपमान.

दुःख कसेंहि सहावें होऊं द्यावा परी न अपमान
मान धडाला कसला गेल्यावरती शिरासकट मान ४०६

जावें कोठें न अना-मंत्रित टाळावयास अपमान
मान न जेथें राहे तेथें होईल कां समाधान ४०७

## अपहार.

चिंतूं देखील नये करणें तर थोर पाप अपहार
बाधक दुःखद होतो दुसऱ्यास तसा स्वतास अपकार ४०८
कपटें परस्व हरिलें अथवा जें मिळविलें बलात्कारें
खाईल मना अक्षय, सुख अपहारें विलोपतें सारें ४०९

## व्यसन.

व्यसना करितां लागे एकच धन तें परोपकारांत
वेंचावें न बरें कां, पडेल दुष्प्राप्य पुण्य पदरांत ४१०
दुर्गम दुस्तर अहि निधि चढले तरले न परतले मागें
दुर्व्यसनीं तेच कसे बुडती कर टेंकिती नवल लागे ४११

## बलात्कार.

अधिकार बलात्कारा कठिण पडे काम युक्तिनें घडतें
युक्तीच्या वाटेनें जातां बहुधा कुठें न तें अडतें ४१२
करितां न बलात्कारा हितोपदेशें परास वळवावें
वळवून त्यास घेतां पक्षाला आपल्या बळ दुणावे ४१३

## क्रोध.

अग्नि जलें क्रोध तसा नम्रत्वें सहज होतसे शांत
भडके अनम्र वचनें पावकसा तेल ओतितां त्यांत ४१४
अप्रिय कसेंही झालें येऊं द्यावा तरी न संताप
स्थिर मन ठेवी त्याला वश होउन आदरूं नको पाप ४१५

आटोपितां न आला राग तरी आवरून धर रसना
अवसर दे न मुखांतुन बाहेर पडावयास दुर्वचना ४१६

## हसणें, नांवें ठेवणें.

व्यंग कसेंहीं असलें तरि हिणवावें बरें न कोणाला
राहे व्यंग जसेंच्या तसेंच लागे परी किति जिवाला ४१७
शंखास शंख कारण कारण नसतां बळें ह्मणावें न
शतमूर्खहि असला तरि त्याला कटुवचन हें सहावे न ४१८
दगडास दगड ह्मणतां नांवें तुमच्याच दगड फोडील
वाद विघातक तुमच्याविषयीं खोटा जनांत पिकवील ४१९
न हंसावें दुसऱ्याला एकादें व्यंग त्यांत जरि असलें
न हंसें प्रत्यक्षचि तें त्याच्या हृदयात तीव्र दुःख सले ४२०

## संशय.

सबळ प्रमाण नसतां कोणावरती न संशय धरावा
केवळ न संशयानें कोणाला व्यर्थ दोष लावावा ४२१
कोणावर न करावा आरोप न खातरी जरी पुरती
संशय खोटाहि तरि होते लोकांत मान्यता कमती ४२२

## मोह.

उन्नत विचार ज्याचे धनलोभें तो पडे न मोहांत
झिडकारितो तयानें केला जो आपला पुढें हात ४२३

## लोभ.

पुढच्या आशेवरती निश्चित करिंचा न लाभ दवडावा
लोभास वश न होउनि अनुतापाचा प्रसंग टाळावा ४२४

## कपटपर हानि.

बुडवावें दुसऱ्याला ह्मणून जो कपटबुद्धिनें वाग
अधमपणाचें त्याच्या त्याला भोगावयास फळ लागे ४२५.

## स्वार्थ.

परहानि स्वार्थास्तव उद्युक्त करावयास जो असतो
त्याच न्यायें नवल न बळी पराच्या हितास तो पडतो ४२६

## संकट.

सामान्य निवारावें संकट तों त्याहुनी दुजें मोठें
केव्हां केव्हां न कळत भवितव्यें निकट येउनी लोटे ४२७

## खोड.

परभाषण गुप्तपणें ऐकायाची बरी नव्हे खोड
पहिल्यापासून मनीं फुटूं न दे दुर्गुणास ह्या मोड ४२८

## चहाडखोर.

विषदंत उपटल्यानें दंश कराया न ये भुजंगास
छेदुनि रसना न तसा भलेपणा ये चहाडखोरास ४२९
मंत्रें वा उपचारें विष अहिचें उतरतें चहाडीचें
कसल्याही न उपायें, त्याच्या एकहि नसेल तोडीचें ४३०
दुसऱ्या कोणा न तसे भितात सगळे चहाडखोरास
न धजे कोणी सहसा जवळ तयाच्या उभें रहायास ४३१

## अलक्ष.

क्षुल्लक कितीहि असली मानावी तरि न वस्तु कसपट ती
थोड्याच अलक्षानें मोठेमोठे अनर्थ उद्भवती ४३२

## चोर.

चोराच्या भय चित्तीं उपजवितें सांवली जशी त्याची
भीति तशी उपजावी अंतःकरणामधें असत्याची ४३३

## दोष.

हुडकावे न पराचे आधीं निजदोष ते निवारावे
परदोषाविष्करणें कोठून तुवां शुचित्व पावावें? ४३४

## नीतिभ्रष्ट.

नीतिभ्रष्ट न हर्षे दुसऱ्याच्या आपल्याहि उत्कर्षीं
अवनति हळूहळू त्या गोंजारुनि आपल्याकडे कर्षी ४३५
नीतिभ्रष्ट तयाच्या लोटावें लागतें न पतनाला
वृक्षापासुन तुटलें सृष्टनियम पाववी फल तळाला ४३६
नीतिभ्रष्ट तयाला सरळ सदाचरण वांकडें वाटे
कंटक रुतती न तया दुर्गतिच्या चालतां पदीं वाटे ४३७
नीतिभ्रष्ट वराया उत्सुक असतो किती अवदशेला
भुलवावया तया ये मोहाचा पांघरून ती शेला ४३८
नीतिभ्रष्ट न परते दुर्गतिच्या वाहतो प्रवाहांत
लोकोक्ति सत्य सत्यच बुडत्याचा अधिक पाय खोलांत ४३९
नीतिभ्रष्ट तयाला साधुवचन साधुसंग कटु वाटे
उपदेश शब्द मृदु परि तीक्ष्ण जसे बोंचती तया कांटे ४४०

## दुष्ट.

दंडच योग्य खलाला साह्य भल्यानें तयास न करावें
दुष्टा दुष्ट मिळेलच सुष्टें त्याचें न नांवही घ्यावें ४४१

जो प्रकृतिदुष्ट तो का उपकारें स्वस्वभाव सोडील ?
शुभ्रत्व कोळशाला धुतल्यानें साबणें न येईल ४४२

## वंचक.

वंचक साधायातें हित बोले मधुर साधुवाद करी
न फसे सावध राही विश्वासे क्षण न धूर्त त्याजवरी ४४३

## मरण.

स्थिति कुल धन वैभव पद इत्यादिक भेद निधन ठेवी न
सर्वांतें सम लेखी, त्याजपुढें सर्व सारखे दीन ४४४
वर्तन विशुद्ध ज्याचें मरणाचें भय न त्याजला वाटे
मरण कळे कोणास न केव्हां येईल कोणत्या वाटे ४४५

## भाषण.

जें होय गोड शब्दें त्याकरितां कां कठोर बोलावें
मार्ग सुखाचा असतां चालत कांट्यावरून कां जावें ४४६
नाहीं ह्मणतां नाहीं होतां होईल तों न दुखवावें
अन्यास न युक्तीनें वाटूं वैषम्य त्यामुळें द्यावें ४४७
परभाषण ऐकावें शांतपणें भाव समजुनी घ्यावा
न स्वमतें अनपेक्षित वक्त्याचा व्यर्थ ओघ खंडावा ४४८
क्रोधोत्तरापरिसही अतिदुःसह वचन मर्मभेदक तें
अंतर्यामीं शिरतें घर करितें कधिं न तेथुनी निघतें ४४९
भाषण असे रुप्याचें मोलाचें मौन परि सुवर्णाचें
ज्ञात्याचें नसलें तरि भूषण तें एक होय मूर्खाचें ४५०
भाषण तेंच ह्मणावें चाले उद्दिष्ट धरुन हेतूस
उपयोग काय त्याचा मुसळें पुष्कळहि कांडिलें तूस ४५१

भाषण गोड जयाचें वाटे सर्वांस तो कसा गोड
उत्तम इतर गुणाला उद्दीपक होय ही भली जोड ४९२
कंठीं प्रिय मधुर गिरा सद्गुण मणिखचित जो गळां त्याला
कनकाची मोत्यांची रत्नांची काय त्याजला माला ४९३
बोलावें स्पष्टपणें सेवावी मूकता प्रसंगास
वाचालता नसावी ह्याच गुणीं मानिती शहाण्यास ४५४
एकच मधुवच उपकृतिबीजत्वें वृक्षरूपता पावे
पुष्कळ मधुर फलाच्या आस्वादानें मनें न कां धावें ४९५

## मनुष्य.

राजाधिराज केवळ सर्व प्राण्यांत मानव श्रेष्ठ
अंतर्बाह्यदृगेंद्रिय—विषय असावेत त्या हित प्रेष्ठ ४९६
आत्म्याचा देहावर ठेवी निर्बंध तोच नर एक
मानव काय ह्मणावा यदंतरीं मृत न जागृत विवेक ४९७
आत्मा शास्ता नसला त्याची देहास काय तरि जोड
दास स्वयेंच बनला तेथें दुर्गतिविना नसे तोड ४९८
आत्माच मनुष्याचा आहे अत्यंत उत्तमांश जरी
देहास तरि जपावें कारण कीं त्यांत तो निवास करी ४९९
देहाच्या संसर्गें आत्म्यासहि दुःखभावना होती
न विझे चिरदीप्त जरी स्थिर असली हेलकावते ज्योती ४६०
हृदय दयालु सयुक्तिक विचार शांत स्वभाव आरोग्य
अनुरूप मनुजतेला गुण मिळवायास हे गमे योग्य ४६१
सत्य प्रामाणिकता इत्यादि अवश्य गुण न असतील
संसारेंच न केवळ गृहस्थता मानवास येईल ४६२

स्थितिच्या कसास उतरे हीण दिसूं दे न तोच शुद्ध नर
तनु पावकीं जळे मृत तद्यश न घटे परंतु लेशभर ४६३

## श्रम.

होतो अतिश्रमानें कमती जो कार्यशक्तिसंचय तो
व्यायाम क्रीडेनें रंजन विश्रांतिनें पुन्हा भरतो ४६४

## विश्रांति.

पुष्कळ मनास होतां श्रम त्याला पाहिजे विसावा हे
आहे अवश्य अक्षय श्रमें झिजे न प्रसन्न तें राहे ४६५
होतां शारीर श्रम पुष्कळ थकतें शरीर मनहि थके
विश्रांति युक्त व्हावी, श्रम त्याविण तें सहावया न शके ४६६
खेळांत वेळ थोडा गेला तो फुकट घातला नाहीं
खेळ असाच हवा परि हानि न ज्यापासुनी घडे कांहीं ४६७
विद्याभ्यासें येती सद्गुण खेळांत तेच दृढ होती
वेड परंतु नसावें खेळाचें खोड कां बरी हो ती ? ४६८
खेळामध्यें लागे राखावी केवढी तरी नेकी
प्रतिपक्षाचें कोणा लक्ष न तिजपासुनी ढळूं दे कीं ४६९
खेळांत व्यवहारीं असते लागे तशी चढाओढ
तरि न लबाडी खपते अंगीं असल्यास मोडते खोड ४७०
राखी खेळांतहि जो मान तया केवढा सचोटीला
भांडण तोच निवडितो कोण न वंदील सत्यवृत्तीला ४७१
एकच एक अखंड व्यवसाया सहज चित्त कंटाळे
पालट मधून केला तर तें बहुधा कधीं न घोंटाळे ४७२

खेळांमध्यें होतें रंजन, उत्साह मानसीं भरतो
थकतें शरीर जीवहि घटकाभर होय त्यास विश्रम तो ४७३

## तारुण्य.

सत्यविनय सात्विकता उत्तम गुण यौवनास भूषविती
निर्गुण हेमालंकृत निजतेजें ते नरास लाजविती ४७४

## मर्यादाप्रमाण.

आहे प्रमाण ज्या त्या गोष्टीला तें कधीं न लंघावें
अविचारें वा लोभें लंघी सुख त्याजला कसें व्हावें ४७५

## संसार.

मायापरिवेष्टित भयचिंता–क्लेश–प्रपूर्ण संसार
ह्मणती असार त्यांतच कर्तव्यें लाभतें परी सार ४७६
कर्तव्य धर्म जाणुन वागे भवगुह्य उमजलें ज्याला
न विटे संसाराला सिद्ध सहायास सर्व तापाला ४७७
आनंदमय गमे हा जागृत असतां विवेक संसार
देतो विकार बद्धा पीडा जरि तोच उलट अनिवार ४७८
मानव आपण सारे आहों भवसागरांत सांपडलों
वाऱ्याची भरतीची वेळ चुकविली तरी सुखा मुकलों ४७९
सत्यज्ञानाचा गुण हित करितो दुःखमूल उच्छेदी
संसाराचें दुर्घट दुर्ज्ञेय रहस्य तत्वता भेदी ४८०
सुख दुःखाचें मिश्रण आहे संसार मधुरता नुसती
कटु सेवन केल्याविण कवणा चाखावया न ती मिळती ४८१
भार जरी संसारीं दुःखाचा लागला वहायास
वाटे हलकाच तया ज्याच्या हृदयांत शांतिचा वास ४८२

## भरंवसा.

अनुभव आल्यावांचुन कोणावर भरंवसा न टाकावा
खळ असतो टपलेला साधाया आपला अचुक कावा ४८३
विश्वास ठेविल्याविण कोणाचेंहि जगीं नसे निभलें
होऊं न हानि देती धूर्तपणें वागुनी तथापि भले ४८४
भावी लाभीं न धरीं विश्वास पुढें कळे न काय घडे
घोंट मुखीं जावा तों करांत धरिलें गळून पात्र पडे ४८५
विश्वासून परावर इच्छित कार्यांत यश कसें यावें
ये जातीनें करितां तें काम परावरी न सोंपावें ४८६

## गंभीरता.

गंभीरता असुनिहि उदास दुर्मुख कधींहि न रहावें
अंगीं शौर्य असावें, अविचारें साहसांत न पडावें ४८७

## एकी.

खेळांमध्यें होते एक मनानें कशी त्वरें एकी
व्यवहारांत समाजीं सत्कार्यीं नवल लवहि न दिसे कीं ४८८
सर्व बळीं इच्छेचें बळ मोठें पाहिजे मनुष्यास
तोच बलिष्ठ खरा ये स्वेच्छेनें वळवितां मन जयास ४८९
एकेक क्षुद्र परी संयोगें शक्ति केवढी येते
झाला बद्ध करील काथ्याचेंही चऱ्हाट न तुटे तें ४९०
बल शत्रुचें न चालूं देती पशु राहुनी जमावानें
जिंकील कोण त्यांना स्वबलें जे वागतात ऐक्यानें ४९१

## निश्चय.

परभाषण ऐकावें पुरतें समजून हेतु अर्थ खरा
घ्यावा विचार केल्यावांचुनि निश्चय न कोणताहि बरा ४९२
निश्चय केल्यावरती स्वस्थ बसावें न शेवटा न्यावा
विघ्नें अनेक आलीं मध्यें तरि तो न डळमळूं द्यावा ४९३
निश्चयरविप्रभेनें विघ्नाचे त्वरित वितळती मेघ
निश्चय ठाम असावा दगडावर काढिली जशी रेघ ४९४
निश्चयबळेंच मोठीं कार्यें दुर्घट तडीस जातात
जे निश्चयीं न टिकती उन्नति मार्गांत ते घसरतात ४९५
जो निश्चयीं न ढळतो विघ्नें वारून घे न माघार
टाकी पुढें पुढें पद त्याच्या कंठीं पडे यशोहार ४९६

## दारिद्र्य.

दारिद्र्य आंत शिरतां प्रेम गृहांतून काढितेंच पळ
विद्युत् ह्मणतात परी प्रेम तिच्याहूनिही दिसे चपळ ४९७.
इहलोकींचा करिते तापद दारिद्र्य काळजी वास
हटवी मागें दे धन बाधूं ना कठिण काळ जीवास ४९८
ज्यापाशीं धन थोडें त्यापेक्षां अधिक होय निर्धन तो
तृष्णा न शमे ज्याची लोभानें जो सदैव तळमळतो ४९९
दारिद्र्याच्या चरकीं चिंता आत्म्यास घालुनी चिरडी
रगडी तिचीच नरडी शांतिबळें तोच एक धीर गडी ५००

## सौजन्य.

चातुर्य स्वाभाविक गुण ये संपादितां जरी न हटे
वागावें सौजन्यें त्यजून कौटिल्य कां तरी न खटें ५०१

नुसत्या सौजन्यानें लाभे जें ओतिल्या न धनराशी
लोकांचें प्रेम जडे खार न लागे मुळींच पदराशी ९०२
सौजन्य मन पराचें आकर्षी सुप्रसन्न तें ठेवी
व्यवहारीं यापरती सुखदायक अन्य कोणती ठेवी ९०३

## पोषाख.

भपका नको तरी पण आवश्यक ठाकठीक ठेवावी
बाह्यस्वरूप अंतर्दर्शक ही लोकरीति मानावी ९०४
अंगावर मळ चिंध्या ह्याशीं कर्तव्य काय आत्म्यास
पडकें गळकें मलिनहि गृह कोणा आवडे रहायास ९०५
वस्त्रालंकाराचा करून सत्कार या बसा ह्मणती
लौकिकरीति अशी ही, ज्ञाते अंतर्गुणास परि पुसती ९०६
मोठ्या शिष्टपणाचा पोषाकें आव घातला न टिके
बाह्य स्वरूप अंतर्गुण प्रकटतांच तें पडे लटिकें ९०७

## भीड.

पडतां भीड मुखांतुन कठिण पडे काढणें बहु नकार
तो काढवला नाहीं तर भोंवे भीड दूर ती सार ९०८
केव्हां केव्हां करिते जन्माचें दुष्ट भीड मातेरें
दुर्गतिचे चुकवाया येती पडतां गळां न ती फेरे ९०९
हलक्या कामाकरितां भीड न मोठ्यास घालणें विहित
कीं तेणें समयाला मोठें साधावया अडो न हित ९१०

## स्वच्छता.

निर्मल शरीर वस्त्रें स्वच्छ तशीं पाहिजेत वापरलीं
व्यवहारारोग्यास्तव गोष्ट न कोणासही असे सुटली ९११

बाह्यांग मलिन निर्मल तसें असे अंतरंगही बहुधा
अंतर्बाह्य निरंतर समशुचिता आवडे महा विबुधा ६१२
आवश्यक आरोग्या ठेवावी स्वच्छता शरीराची
पापावरोधकारक शुचिता लागे तशीच चित्ताची ६१३

## बुद्धि.

थोडी फार मनुष्या देवानें बुद्धि जी दिली आहे
योजावी सत्कार्यी साधन अतिसुलभ सद्यशाला हें ६१४
बुद्धि असे मनुजाला सुधारणा ये करावया त्याला
पशु मानवीं असे हा भेद तयें श्रेष्ठता मनुष्याला ६१५

## दुर्बुद्धि.

दुर्मति पुनः पुन्हा जरि वळवी मन पाप आचरायास
दुर्बोध तिचा न मना आणावा त्यांत कीं चिरायास ६१६

## वासना.

मन हेलकावती ज्या सोडाव्या वासना न मोकार
वाईट त्या तरी कां केल्याविण राहतील अपकार ६१७
सर्व बळीं इच्छेचें बळ मोठें पाहिजे मनुष्यास
तोच बलिष्ठ खरा ये स्वेच्छेनें वळवितां मन जयास ६१८
प्रतिबंधक इच्छेचा घालाया पाहिजे तट मनास
करितां प्रवेश आंत न कीं यावा दुर्विकार चोरास ६१९

## सदसज्ञता.

सदसज्ञता मनावर ज्याच्या निर्बंध चालवी पुरता
तो श्रेष्ठ वंद्य मानव वा अवतरली तयामधें सुरता ६२०

सदसज्ञता दिली कां हवें तसें मानवास वागाया
जाऊं द्यावी अनुपम जगदीशाची न देणगी वायां ६२१

## स्वातंत्र्य.

इच्छा स्वातंत्र्याची असली तर तें मिळे सदाचारीं
कर्तव्यें तें मिळवी साध्याचा एक तोच अधिकारी ६२२
परतंत्रतेंत कसलें सुख वैभव मान आणि थोरपद
कनकाच्याही असल्या तरि होतिल काय शृंखला सुखद ६२३

## मित्र.

मित्र असावे थोडे निवडक जे उतरले कसोटीला
टाळावे स्वार्थास्तव जोडाया इच्छितात मैत्रीला ६२४
कारण नसतां सलगी करितो जो फार दाखवी लगट
स्वहिताचा कांहिं तरी त्याचा निःशंक हेतु अप्रकट ६२५

## कला.

मोठ्या करामतीची संपादायास जन्मभर खपला
लाभ न कवडीचा तरि उपयोगी ती ह्मणेल कोण कला? ६२६
एकादी साधारण उपयुक्त कला असे जयापाशीं
रहावयाचा त्या ती येऊं देई प्रसंग न उपाशी ६२७

## कृतज्ञता.

हिंस्र पशूंतहि मोठ्या कृतज्ञता थोडकी तरी दिसते
त्याहून अधिक हिंसक न ह्मणावे कां कृतघ्न मानव ते ६२८
पशुपक्ष्यांवर केले स्मरती उपकार ते प्रसंगास
थोडि तरी वाटावी त्याची लज्जा कृतघ्न मनुजास ६२९

## शेजारी.

शेजाऱ्याच्या पडतो उपयोगीं साह्य जो तयास करी
वाराया झटतो तो येतां आपत्प्रसंग त्याजवरी ५३०
शेजाऱ्याचें द्यावें होतां होईल तों पडूं न उणें
संपादावें लोक–प्रेम जगीं ह्या सदा स्व-हित निपुणें ५३१

## लक्ष.

कामाच्या वेळेला लक्ष गढावें समग्र कामांत
कामाचाहि नसावा विचार घोळत मनांत खेळांत ५३२
यश न मिळे त्यास कसें ज्याची क्षणहीं न कार्यदृष्टि चळे
होईल चांगलें कां लक्ष न कामावरी जरी सगळें ५३३

## संवय.

दुष्कर कशीहि असली अभ्यासें गोष्ट वाटते सुगम
संवयीचें बल मोठें लटपटवी सृष्टिचाहि ती नियम ५३४
जें काम नव्हे ज्याचें लावी तें त्यास खावया गोते
वहिवाटला तयाला पीडादायक तसें न तें होतें ५३५

## बंधुप्रेम.

सर्वांशीं वागे जो बंधुत्वाच्याच एक नात्यानें
तोच खरा देवाचा भक्त तया जाणिलें खरें त्यानें ५३६

## लौकिक.

मिळवावें नांव जनीं वाटे यांतच कृतार्थता ज्याला
युक्तीनें वळवावें त्यानें सद्वर्तनें समाजाला ५३७

## विनोद.

केला विनोद कोणी तरी कशाला उगीच खवळावें
हलतां पर्वत पवनें त्यानें क्षुद्रत्व कां न पावावें १३८

## उचापत.

न बरा उचापतीचा व्यवहार पुढें तरी जडे सवय
खर्च न आवरितां ये जीवनयात्रा ह्मणून दुःखमय १३९

## स्वरूप.

रूप मनोहर मोहक जनमन आकर्षितें स्वभावगुणें
अनुकूल तें न ज्याला काढावें निजगुणीं भरून उणें १४०

## उमेद.

तारुण्यात असे जी उमेद ती फसवितें किती वेळां
मोठी हांव नसावी सोडावें मोकळें न आशेला १४१

## हित.

स्वहितार्थ आपलासा करून घ्यावा जरी असे पर तो
इच्छित कार्य कराया प्रतिकूल असेल तो तरी नडतो १४२

## परिमितता.

आहार तशी निद्रा बेताची मात्र होय सुखकर ती
होतां ज्यास्ती सुस्ती आणी कीं आळसासही भरती १४३

## क्रिया.

जी जी आपण करितों प्रतिक्रियेनेंच ती क्रिया फळते
सुख लाभे दुःख घडे असे क्रियेचेंच आपल्या फळ तें १४४

## बोध.

हितबोधा अवमानी तो घेतो करुनि आपली हानि
जी एकवार झाली भरून ये ती न हानि हाहांनीं ५४५

## व्यवस्था.

वागे न जो व्यवस्थित श्रम उलटे वाढवून तो घेतो
क्षुल्लक गोष्टीकरितां बसतो वेळेस खात हिसके तो ५४६

## साख.

गेलें सर्वस्व तरी जावो जावी परी न साख रती
गोडी गेल्यावरती कोणाला आवडेल साखर ती ५४७

## ज्ञाता.

ज्ञात्याचें मुख असतें त्याच्या हृदयांत तो न बडबडतो
मूर्खाचें रसनाग्रीं हृदय करी ह्मणुन फार वटवट तो ५४८
मित भाषण विबुधाचें लक्षणकृति अधिक करुन दाखविती
होणें जाणें थोडें मूर्खाच्या वल्गना परंतु किती ५४९

## आजकाल.

न उद्यांवरी विसंबें, जें झालें आज तेंच मात्र खरें
होई न आज ज्याला कार्य तयाचें जसें उद्यां न सरे ५५०




---

पृष्ठ ३७-आर्या ३८१ चा चरण २ यांत **त्वबुद्धी** असें आहे, तेथें **त्वद्बुद्धी** असें वाचावें.

सतत पन्नास वर्षांच्या पूर्ण अनुभवानें उत्तमोत्तम

ठरलेला व नांवाजलेला,

दूषित रक्त शुद्ध करणारा,

# डॉ० वामन गोपाळ

यांचा

जगत्प्रसिद्ध

# सार्सापरिला.





देहाचा पंचप्राण म्हणजे शुद्ध रक्त होय, तेंच एकदां बिघडलें कीं, नानातऱ्हेचे रोग देहांत आपला शिरकाव करूं लागतात.

भयंकर अशा उपदंशजन्य विकारामुळें व तदनुषंगिक होणाऱ्या पक्षघातासारख्या रोगामुळें अर्धांगवायु—अवयव लुले पडणें—स्मरणशक्ति कमी होणें, शरीरावर गांधी उठणें, व्रण व काळे डाग पडणें, संधिवात व दूषित रक्तामुळें उद्भवणाऱ्या इतर सर्व रोगांवरही हाच **सार्सापरिला** देणें फारच महत्वाचें व अगत्याचें आहे.

## अनुभवा शिवाय गुणाची कल्पना होत नाहीं.

किंमत १ बाटलीस रु० १। टपाल खर्च ५ आणे निराळा. चार बाटल्यांस टपाल खर्चासह रु. ४॥—

डॉ० गौतमराव केशव,

ठाकुरद्वार पोस्टामागें, मुंबई. नं. २.



**त्वरा करा !  त्वरा करा !!  त्वरा करा !!!**

# घड्याळें बक्षिस.

सर्व हिंदुस्थानांत मोठमोठीं सुगंधी अत्तराचीं हजारों दुकानें आहेत. परंतु अत्तरावर आजपर्यंत कोणीही घड्याळें बक्षीस दिलीं नाहींत. आमची कंपनी सतत दहा वर्षें चालत आहे. परंतु आजपर्यंत बक्षिसें देण्यांत आलीं नाहींत. बक्षिसें देण्याचा उद्देश आमचे कंपनीची साऱ्या हिंदुस्थानभर प्रसिद्धी व्हावी आणि आमचे अत्तरांचा जारीनें खप व्हावा म्हणून देण्यांत येत आहेत. परंतु सदरहू बक्षिसें लवकरच बंद करण्यांत येतील. तरी आमचे देशबंधूंनीं वरील संधि दवडूं नये. आमचे कंपनींत–सुरंगी, मालती, गंधराज, दिलखुष, दवणा, जाई, चमेली, खस, हिना, पाच, केवडा वगैरे सर्व तऱ्हेचीं अत्तरें तयार होतात. **दर तोळयास ४ रु.**

वरील कोणतेंही एक तोळा अत्तर मागविल्यास एक खिशांतील **रास्कोप लिव्हर** घड्याळ बक्षीस. पाऊण तोळा मागविल्यास एक **बर्मा अलार्म** घड्याळ. अर्धा तोळा मागविल्यास एक **बर्मा टाईमपीज** घड्याळ. पावतोळा मागविल्यास रवीवर्म्याचीं ( १२ ) चित्रें बक्षीस.

**टी. आर. राणे. आणि कं०,**

सोल एजन्ट धी इंडियन परफ्यूमरी मार्ट ( गिरगांव ) मुंबई, नं ४